

**महात्मा जोतीराव फुले** हे एकोणिसाव्या शतकातील एक श्रेष्ठ समाजसुधारक. स्त्री शिक्षण, दलितांचे शिक्षण, अस्पृश्योद्धार आणि समाज सुधारणेचे इतर विषय यासंदर्भात जोतीरावांनी कार्य केले. भारताच्या परपंरागत समाज संस्थाच्या विरुद्ध बंड करणारे पहिले पुरुष म्हणजे जोतिबा फुले. जोतीरावांची विचारसरणी क्रांतिकारक होती, महाराष्ट्रातील विचारवंतांच्या नव्या पिढीने त्यांचे वैचारिक ऋण मान्य केलेले आहे.

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** (1901-1994) हे संस्कृत आणि मराठीचे प्रसिद्ध विद्वान व लेखक होते. त्यांचे 'वैदिक संस्कृतीचा विकास', 'हिंदुधर्माची समीक्षा', 'जोतिनिबंध' इत्यादी ग्रंथ प्रसिद्ध असून त्यांनी धर्मकोशांचे संस्कृतमधून व विश्वकोशाचे मराठीतून संपादन केले. भारत सरकारने 'पद्मविभूषण' ही पदवी देऊन त्यांचा गौरव केला.



रु. 30.00

ISBN 81-237-2617-1

नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# जोतिचरित्र



तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# पहिल्या आवृत्तीचे निवेदन

गेले 1990 हे वर्ष महात्मा जोतीराव फुले यांच्या मृत्युशताब्दीचे वर्ष होते. यंदाचे वर्ष 1991 डॉ. बाबासाहेब यांच्या जन्मशताब्दीचे आहे. जातीयतेच्या शापातून भारतातल्या सगळ्या हिंदूंना मुक्त करण्याच्या कार्यात या दोन महापुरुषांचा वाटा मोठा आहे.

जोतीरावांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने दिल्ली येथील नॅशनल बुक ट्रस्टने त्यांचे चरित्र प्रकाशित करायचे ठरविले. ट्रस्टने मला हे चरित्र लिहिण्याची 1990 साली विनंती केली. मी ती विनंती मान्य केली. जोतिरावांचे संक्षिप्त चरित्र मी बाबासाहेबांच्या जन्मशताब्दी साली म्हणजे यंदा 1991 साली पूर्ण करून वाचकांना सादर करीत आहे.

या चरित्राला आधारभूत मुख्यतः दोन ग्रंथ. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या वतीने प्रसिद्ध झालेले हे ग्रंथ आहेत. हे ग्रंथ म्हणजे महात्मा जोतीराव फुले : समग्र वाङ्मय (संशोधित आवृत्ती : संपादक : य. दि. फडके) आणि महात्मा जोतीराव फुले (लेखक : धनंजय कीर).

26 सप्टेंबर 1991

लक्ष्मणशास्त्री जोशी

# अनुक्रमणिका

एक

# जोतीरावांचा जन्म आणि बालपण

जोतीराव फुले हे भारताच्या आधुनिक मानवतावादी संस्कृतीचे एक आद्य प्रवर्तक होत. असे आद्य प्रवर्तक अनेक आहेत. उदाहरणार्थ : बंगालमध्ये राजा राममोहन रॉय, गुजरातमध्ये दयानंद स्वामी इत्यादी. परंपरेमध्ये समाजपरिवर्तन घडवण्याची शक्ती नाही; समाज स्थिर, थंड गोळ्यासारखा पडून आहे; त्याच्यात गती, तेज आणि उष्णता नाही; त्याची कारणे शोधून नवा एकात्म भारतीय समाज निर्माण करणारा ध्येयवाद सांगणारे हे आद्य प्रवर्तक होऊन गेले. परंपरागत बंधनांना, श्रद्धांना आव्हान देणारी जीवनमूल्ये आधुनिक शिक्षणामुळे तरुण पिढीला दिसू लागली. अशा तरुण पिढीमध्ये जोतीराव सारखे धीरगंभीर जे थोडे झाले, त्यांना आधुनिक संस्कृतीची प्रेरणा मिळाली. हे आधुनिक मानवतावादी युग भारतावर प्रभाव गाजवू लागले. फ्रेंच राज्यक्रांतीच्या स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव या जीवनमूल्यांचा प्रथम सामर्थ्यशाली आविष्कार ज्यांनी केला, त्यांच्यापैकी जोतीराव फुले होत. फ्रेंच राज्यक्रांतीच्या मूल्यांशी विरुद्ध असलेल्या भारतीय परंपरेला जोतीरावांनी 'गुलामगिरी' ही संज्ञा दिली. भारतामध्ये प्राचीन समाजसंस्थेतील गुलामगिरी कधीच नांदली नाही. गुलामाच्या देहावर मालकाची वैयक्तिक सत्ता म्हणजे मालकाचे दास्य, हे प्राचीन समाजसंस्थेचे लक्षण होते. असे लक्षण भारतीय समाजसंस्थेच्या इतिहासात आढळत नाही; परंतु दुसरे एक सामाजिक प्रगती आणि विकासाला वाव न देणारे लक्षण म्हणजे जन्मसिद्ध उच्च-नीच जातिसंस्था होय. उच्चतम जात म्हणजे ब्राह्मण आणि नीचतम जात म्हणजे अस्पृश्य, महार, मांग, चांभार, धेड इ. होत. ब्राह्मण हा पुरोहितवर्ग. प्राचीन भारतीय समाज हा धार्मिक असल्याने त्याची धार्मिक कर्तव्ये काय काय आहेत, हे धर्मग्रंथांच्या आधारे ब्राह्मण सांगत आलेला आहे. त्या धर्मग्रंथांना श्रुति, स्मृति आणि पुराणे अशी संज्ञा आहे. ब्राह्मण हा अत्यंत पवित्र मानला गेला. इतर जाती पवित्र व अपवित्र या दोन टोकांच्यामध्ये नांदणाऱ्या होत. जोतीरावांच्या मताप्रमाणे ब्राह्मणांनी 'हम करेसो कायदा' या न्यायाने आपल्याकडे समाजशासनाचा अधिकार घेतला. या अधिकाराखाली समाज नांदला. त्या अधिकाराला आव्हान जोतीरावांनी 'गुलामगिरी' या संज्ञेने दिले. या गुलामगिरीच्या बंधनातून भारतीय मन मुक्त झाले, तरच त्याची सर्वांगीण प्रगती

होऊ शकेल असा इशारा जोतीराव आपल्या ग्रंथांतून व निबंधांतून देतात. जोतीरावांचे चरित्र हे एका महान् कृतिशील पुरुषाचे चरित्र होय.

शेटीबा हा त्यांचा ज्ञात असलेला मूळ पुरुष. पुणे जिल्ह्यातील पुरंदर तालुक्यातील खानवली गाव हा त्यांच्या पूर्वजांचा मूळ गाव होय. शेटीबाला राणोजी, गोविंदा व कृष्णा असे तीन मुलगे झाले. त्यांचे मूळचे आडनाव गोऱ्हे. ते फुलमाळ्याचा धंदा करू लागले. त्यामुळे फुले झाले. उत्तर पेशवाईत त्यांचे पूर्वज फुले आणि फुलांच्या निरनिराळ्या वस्तू, गोंडस व सुवासिक सुंदर फुलांचेच विविध आकार आणि प्रकार ते पेशव्यांना पुरवत. पेशव्यांसाठी फुलांच्या गाद्या, उशा व अन्य प्रकारचे पोशाख बनवीत. पेशव्यांनी त्यांना बाग सोपवला व पस्तीस एकर जमीन इनाम दिली. तेव्हापासून त्यांचे गोऱ्हे हे नाव जाऊन फुले हे नाव आले. पेशवाईत त्यांचे पूर्वज भाजीपाल्याचा धंदा करीत. फुल्यांचे वडील गोविंद. त्यांचे पूर्वज मळ्यात काम करीत होते आणि भाजीपाला विकण्यासाठी पुण्यात दुकान चालवू लागले. त्या दुकानावर त्यांचा योगक्षेम चांगला चालू लागला. गोविंदरावांचा चिमणा नावाच्या मुलीशी विवाह झाला. पुण्याजवळील धनकवडी गावातील झगडे पाटील यांची ती मुलगी. त्यांना दोन पुत्र झाले. त्यापैकी एक जोती. जोतीचा जन्म 1827 साली झाला.

जोतीरावांचे वडील गोविंदराव यांनी पेशवाईतल्या अनेक घटना प्रत्यक्ष पाहिल्या होत्या व पेशवाईचे वैभव व सत्ता नंतर लुप्त झालेली पाहिली. उत्तर पेशवाईत राज्यकर्ते योग्य पद्धतीने शासनसंस्था न चालविता जातीय पक्षपाताने चालवू लागले. ब्राह्मणांना उच्च पदे देण्यात योग्यतेचा विचार विशेष नव्हता. दुसऱ्या बाजीरावाची ही राजवट होय. ब्राह्मणाला अनेक गुन्ह्यांच्या बाबतीत कायदेशीर कडक शिक्षा न देता, त्या शिक्षा अधिक मऊ करत. सरकारी सारा आकारणीत ब्राह्मणाला भरमसाट सूट मिळे. ब्राह्मण लोक आपल्या जमिनीचा सारा निमपट व त्याहूनही कमी करून घेत. ब्राह्मणांवर दानधर्माचा वर्षाव रावबाजीच्या काळी अधिक होऊ लागला. ब्राह्मणांच्या जेवणावळीत लाखो रुपयांचा चुराडा होऊ लागला. ब्राह्मणांना दक्षिणा देण्यात लाखो रुपये उधळले जात. शेतकऱ्यांची स्थिती अत्यंत केविलवाणी झाली होती. ते सावकारांच्या पेचात सापडले होते. सावकारापायी गुरेढोरे, शेतीपोती गहाण ठेवावी लागत. मूळ रकमेवरचे व्याज फिटत नसे; कारण शेतकरी निरक्षर होता. बरीचशी सावकारी लिहिता-वाचता येणाऱ्या पांढरपेशांकडे, विशेषत: ब्राह्मणांकडेच होती. जातीय अंधश्रद्धेमुळे ब्राह्मणांचे वर्चस्व होते. पाप केल्यावर ब्राह्मणाला दक्षिणा दिली की पापमोचन होते; तसेच ब्राह्मणाच्या अंगठ्याचे तीर्थ घेतले की पाप धुवून निघते, अशी समजूत होती. अजूनही काही प्रदेशांत ब्राह्मणाच्या अंगठ्याचे पाणी पवित्र तीर्थ म्हणून घेण्याची पद्धत आहे. महाराष्ट्रातही ही पद्धत पन्नास वर्षापूर्वी होती. महारामांगाची सावलीही अंगावर पडू नये अशा तऱ्हेने अंधश्रद्धेचा भाव पक्का होता.



स्त्रियांना अशिक्षित व निरक्षर ठेवण्यामध्ये ब्राह्मणांनी विशेष पुढाकार घेतला होता. पेशवाईच्या अखेरच्या काळात धर्मश्रद्धासुद्धा दुराचारी बनली होती. शाक्त पंथ पुण्यातील प्रतिष्ठित ब्राह्मणांमध्ये दृढमूल झाला होता. रावबाजीच्या उच्च अधिकारी वर्गामध्ये ब्राह्मणांचा भरणा जास्त होता व त्यांच्यात शाक्तपंथ पूजा प्रतिष्ठित मानली जात होती. या पूजेत पंच 'म'कार होते. मद्य, मांस, मत्स्य, मैथुन आणि मुद्रा असे हे पाच 'म' कार होत. हांजीहांजीखोर, हुशार, चौकस ब्राह्मणांना खटाटोप करून वरच्या जागा पटकावता येत होत्या. हे भयानक पतनाचे हिडिस दृश्य त्या वेळच्या इंग्रज अधिकाऱ्यानी लिहून ठेवले आहे. तो कालखंड भारतीय संस्कृतीच्या बौद्धिक, शारीरिक व सांस्कृतिक थकव्याचा दर्शक दिसतो. इंग्रजी राज्य आल्याबरोबर माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन हा न्यायबुद्धीचा, उदार उच्च अधिकारी लोकांना आवडू लागला. त्याला मानपत्र देण्यात आले. त्यात म्हटले आहे की, ''तुम्ही राज्य घेतले हे बरे झाले.'' शिवाजी महाराजांनी स्थापलेले मराठी राज्य पहिल्या चार पेशव्यांच्या नेतृत्वाखाली विस्तार पावले. परंतु शाहूंच्या मृत्यूनंतर उत्तर पेशवाईत ते ब्राह्मणी राज्य झाले. शिवाजीचे न्यायप्रधान व गुणप्रधान राज्यतंत्र मोडून पडले. कारभारात न्याय व दक्षता राहिली नाही. इंग्रजी राज्य आल्यावर जे सुशिक्षित तयार झाले, त्यात लोकहितवादी यांचे स्थान फार महत्त्वाचे आहे; त्यांनी पेशवाई व इंग्रजशाही यांची उत्कृष्ट तुलना आपल्या 'शतपत्रे' या ग्रंथात केली आहे.

नव्या आधुनिक शिक्षण संस्थेची इंग्रजी राज्यात स्थापना झाली त्याचे स्वागत आधुनिक विद्येचे साधक राजा राममोहन रॉय यांनी केले आहे. काही इंग्रज अधिकारी संस्कृत पाठशाळा येथील परंपरेने चालवाव्या अशा मताचे होते. परंतु राममोहन रॉय यांनी ''संस्कृत तुम्ही शिकवायला नको, आम्ही आपले पाहून घेऊ. परंतु आधुनिक शिक्षण देणाऱ्या संस्था तुम्ही स्थापा,'' असे इंग्रजांना सांगितले. या आधुनिक शिक्षणाचे फळ म्हणजे आधुनिक समाजसुधारक व धर्मसुधारक होत. त्यात जोतीराव फुले यांचे स्थान महत्त्वाचे आहे. जोतीरावांची आई चिमणाबाई त्यांच्या बालपणीच निवर्तली. पत्नीच्या निधनामुळे गोविंदराव अत्यंत दु:खी झाले; परंतु दुसरे लग्न न करता जोतीच्या संगोपनार्थ एक दाई नेमली. तिने जोतीचे आणि भाऊ राजाराम यांचे निष्ठेने संगोपन केले. गोविंदराव बागेत काम करीत व शिवाय फुलांचे दुकान चालवीत. स्वत:च्या जातीत एक प्रतिष्ठित व्यक्ती म्हणून त्यांचा आदर होत असे. ते शांत व सरळमार्गी होते. परंपरा व चालीरीती यांच्यावर त्यांची श्रद्धा होती. जोती सहा वर्षाचा झाला. हाडापेराने मजबूत, प्रकृतीने सुदृढ आणि देखणा होता. त्या काळात वरच्या वर्गातसुद्धा आधुनिक शिक्षणाची महती स्थापित झाली नव्हती. शास्त्री मंडळी खाजगी पाठशाळा चालवीत. त्यात संस्कृत, व्याकरण, न्याय, वेदान्त, ज्योतिष, अलंकार, धर्मशास्त्र इ. विषय शिकविले जात. व्यापारी व श्रीमंतांची मुले लेखन-वाचन शिकत.

1836 साली इंग्रज सरकारने पुणे जिल्ह्यात काही ठिकाणी ग्रामशाळा सुरू केल्या. त्यात लेखन, वाचन व अंकगणित हे विषय शिकवीत. इंग्रजी राज्य येण्यापूर्वी प्रजेला शिक्षण देणे, ही सरकारी जबाबदारी नव्हती. 1813 साली ईस्ट इंडिया कंपनीच्या राज्यात सर्वांना खुले शिक्षण सुरू झाले.

एकोणिसाव्या शतकाचा इतिहास हा जगावर पाश्चात्य संस्कृतीच्या प्रभावाचा प्रारंभ होण्याचा इतिहास आहे. समाजसुधारणेची प्रेरणा या प्रभावाखाली निर्माण झाली. इंग्रजी भाषेचे ज्ञान देणाऱ्या शाळा सुरू झाल्या. त्यांचा हेतू जनता शिक्षित करणे हा नव्हता, तर इंग्रजांचे राज्य चालवायला उपयुक्त कर्मचारी मिळावे हा होता. लोक शिक्षित करणे हा हेतू ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या ठिकाणी असल्याने त्यांनी 1824 साली साली पुण्यात मराठी शाळा काढली. या संक्रमणाच्या काळात सर्व जनतेला जरी शिक्षणाचे दरवाजे खुले होते, तरी सर्वसामान्य जनतेला शिक्षणाचा महिमा अवगत नव्हता. हे जरी खरे असले, तरी जोतीचे वडील गोविंदराव यांनी आपल्या मुलाला वयाच्या सातव्या वर्षी प्राथमिक मराठी शाळेत घातले. त्या काळची परिस्थिती शिक्षणाची उपेक्षा करणारी जरी होती, तरी काही थोड्या चाणाक्ष व्यक्तींना आधुनिक शिक्षणाचा महिमा पटला होता. गोविंदरावांनी जोतीला शाळेत घातले, ही गोष्ट लक्षात घेतली म्हणजे शिक्षणाकडे बघण्याच्या दृष्टिकोनात बदल होत होता, हे सूचित होते. बुद्धिमान, तरतरीत व उत्साही विद्यार्थी अभ्यासात प्रगती दाखवीत; परंतु ब्राह्मणवर्ग सामान्यपणे इतरांनी शिक्षणाच्या भानगडीत पडू नये, अशाच मताचा होता. गोविंदरावांच्या दुकानातील ब्राह्मण कारकुनाने जोतीना शाळेतून काढावे, असा सल्ला दिला. जोतीने प्राथमिक शाळेतला अभ्यास पूर्ण केला. त्याला चांगले लिहिता-वाचता येऊ लागले, हिशेबही येऊ लागले. लोकहितवादी गोपाळराव देशमुख 1850 साली 'शतपत्रा'त लिहितात, ''एखादा मराठा व इतर जातीचा कारकून ब्राह्मणाने पाहिला, की त्याच्या अंगाचा तिळपापड होतो.'' ब्राह्मण ''कलियुग आले, विद्या शूद्राघरी गेली'' असे म्हणत. ब्राह्मण कारकुनाच्या सल्ल्यामुळे गोविंदरावांनी जोतीला शाळेतून काढले आणि त्याला भाजीपाल्याच्या मळ्यात कामाला लावले. तेही काम मन लावून जोती करत होता. आपला मुलगा इतका प्रामाणिक व उत्साही पाहून गोविंदरावांना फार समाधान वाटले.

त्या काळी बालविवाहाची प्रथा होती. आठव्या दहाव्या वर्षी मुलींची लग्ने होत व बाराव्या-चौदाव्या वर्षी मुलांची लग्ने होत. जोतीरावाचे लग्न तेराव्या वर्षी झाले. पुण्याजवळील धनकवडी गावातील झगडे पाटील यांची मुलगी निवडली गेली. ती आठ वर्षांची होती. लग्न मोठ्या थाटात झाले. विवाहाच्या वेळी इतके लहान वय असे की लग्न कशासाठी करतात, हे मुलामुलींना कळत नसे. जोतीरावांचे मित्र केशवराव भवाळकर यांनी आत्मवृत्तात लिहिले की- ''माझे लग्न ठरल्याची वार्ता कानावर आली तेव्हा मी



आईस माझ्या लग्नाला मला नेशील का ?'' असे विचारले. जोतीरावांचे दुसरे समकालीन लोकहितवादी यांचे लग्न वयाच्या नवव्या वर्षी झाले. त्यांची पत्नी चार वर्षांची होती.

प्राथमिक शिक्षण उत्तम झाल्याने जोतीरावांना वाचनाचा नाद लागला. मळ्यात विश्रांती घेताना व रात्री झोपण्यापूर्वी मिणमिणत्या समईजवळ ते वाचत. त्यांच्या शेजाऱ्यात दोन विद्वान होते. एकाचे नाव गफवार बेग मुन्शी, हे फारशी भाषेचे पंतोजी होते. दुसऱ्याचे नाव लिजिट्. ते ख्रिस्ती धर्मोपदेशक होते. त्यांनी जोतीला अधिक शिक्षणाची आवश्यकता असल्याचे गोविंदरावांना सांगितले. त्याप्रमाणे गोविंदरावांनी 1841 मध्ये जोतीला एका स्कॉटिश मिशनच्या शाळेत घातले. त्या वेळी त्याचे वय चौदा होते. त्याला परीक्षेत प्रथम श्रेणीचे गुण मिळत. आपल्या विद्यार्थीकाळात जोतीने सदाशिव बल्लाळ गोवंडे यांच्याशी मैत्री जोडली. गोवंडे हे ब्राह्मण. बुधवार वाड्यातील सरकारी शाळेत जोती व गोवंडे एकत्र शिकत असताना त्यांचा स्नेह दृढ झाला. जोतीच्या मित्रमंडळीत शेजारी राहणारे मुसलमान मुलगेही होते. त्यांच्याशी हिंदुधर्म व मुसलमान धर्म यात तुलनात्मक चर्चा होत होती. त्यामुळे जातिभेद व धार्मिक श्रद्धा हे हिंदू व मुसलमान मित्रात चर्चेचा विषय झाले. स्कॉटिश मिशनच्या शाळेत जोतीला मानवी हक्क व कर्तव्यासंबंधी विचार प्राप्त झाले. शिवाजी, वॉशिंग्टन यांची चरित्रे त्यांनी वाचली. त्यामुळे वीरवृत्ती व स्वदेश प्रेम वाढीस लागले. जोती व गोवंडे यांच्या मनावर उदात्त भावना निर्माण करणारा महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे 'राइट्स ऑफ मॅन' हा होय. हा ग्रंथ युरोप व अमेरिकेत विचारप्रवर्तक ठरला. थॉमस पेन यांचा हा ग्रंथ होय.

ध्येयसिद्धीसाठी आणि उच्चतम जीवन जगण्यासाठी शारीरिक सामर्थ्य आवश्यक असते हे लक्षात घेऊन, हे दोघे मित्र मर्दानी खेळ खेळत. दांडपट्टा, तलवार, नेमबाजी यात ते प्रवीण झाले. लहुजीबुवा मांग हे अस्पृश्य समाजातील गृहस्थ या दोघांचे या विषयातील गुरू होते. त्यांच्या हाताखाली क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांनी सैनिकी शिक्षण घेतले होते.जोती दांडपट्टा चालविण्यात अत्यंत कुशल ठरले. त्यांचा दांडपट्ट्याचा खेळ पाहण्याकरिता लोकांची झुंबड उडत असे. त्यांची शरीरयष्टी रेखीव, उत्तम होती. स्कॉटिश मिशन शाळेमध्ये मोरो विठ्ठल वाळवेकर आणि सखाराम परांजपे या दोन ब्राह्मण मित्रांशी जोतीची मैत्री जमली. इंग्रजी ग्रंथ समजण्याएवढ्या प्रगल्भ बुद्धीचे जोती व त्यांचे मित्र झाले होते. त्यामुळे एक नवीन विचाराचे जग त्यांच्यापुढे खुले झाले. वाळवेकरांनी आपल्या आत्मचरित्रात म्हटले की, ''विद्यार्थी असताना आमची हिंदू धर्मावरील श्रद्धा उडून ख्रिस्ती धर्माकडे वळली. तथापि आम्ही सर्व धर्मांचा तुलनात्मक अभ्यास करून सार काढले, की प्रत्येक धर्मात अशी काही तत्त्वे आहेत, की ती केवळ श्रद्धेनेच मानावयाची असतात. म्हणून सर्व धर्मात काही समान तत्त्वे आहेत. त्याचेच अनुकरण करावे.'' या विचाराने या मित्रांचा धर्मांतराचा बेत रहित झाला. देव

एक आहे; त्याची पूजा करावी; मुख्य सिद्धान्त असा की परोपकार हे पुण्य व परपीडा हे पाप होय. ख्रिस्ती मिशनऱ्यांनी लोकसेवेचा आदर्श आणि सार्वत्रिक शिक्षणप्रसार करण्यासाठी परिश्रम करणे या गोष्टीवर भर दिला होता तो या मित्रांना पटला.

जोतीने 1847 साली इंग्रजी शाळेतील अभ्यास पूर्ण केला. अमेरिकन स्वातंत्र्याच्या चळवळीपासून जोतीला स्फूर्ती मिळाली. त्यामुळे मानवी समता व मानवी स्वातंत्र्य ही आधुनिक मानवतावादाची मूल्ये जोतीला अस्वस्थ करू लागली. ब्रिटिशांना हिंदुस्थानातून घालवून देण्याच्या कल्पनांनी जोतीराव अगोदरच अस्वस्थ झाले. जोतीच्या विद्यार्थीदशेत महाराष्ट्रात व भारतात ब्रिटिश सत्तेविरुद्ध अनेक लहानमोठी बंडे झाली. उमाजी नाईकांचे 1826 मध्ये; पुणे जिल्ह्यातील कोळ्यांचे 1830 मध्ये; भाऊ खरे, चिमणाजी जाधव, नाना दरबारे यांचे 1839 ते 1846; बापू मांगरे व राघोजी मांगरे याचे 1848 साली, अशी बंडे उद्‌भवली व ब्रिटिशांनी ती यशस्वी रीतीने दडपून टाकली. आपल्या मित्रांच्या साहाय्याने ब्रिटिशांचे राज्य उलथून पाडण्याचे व देश स्वतंत्र व बलवान करण्याचे ध्येय पहिल्या उमेदीत जोतीरावांच्या मनात खोलवर रुजले. ''स्वातंत्र्याच्या विचारांची बीजे ब्राह्मण मित्रांनी व शिक्षकांनी आपल्या मनात पेरली,'' असे जोतीरावांनी आपल्या 'गुलामगिरी' या ग्रंथात नमूद केले आहे. पेशवाई बुडाली तेव्हापासून महाराष्ट्रातील ब्राह्मणवर्गाचा एक गट ब्रिटिशांचे राज्य उलथून टाकण्याच्याच विचाराने कायम भारला गेला. मुंबईचे ब्रिटिश गव्हर्नर सर रिचर्ड टेंपल हे भारताच्या वरिष्ठ ब्रिटिश सत्ताधारी राज्यपालांना लिहितात— ''शिक्षण, वेतन किंवा सरकारी नोकरीतील बढती इत्यादी काहीही सुविधा दिल्या, तरी चित्पावनांना मुळीच समाधान होत नाही. पश्चिम भारतातील ब्राह्मणांइतकी राष्ट्रीय महत्त्वाकांक्षा इतरत्र आढळत नाही.''

जोतीरावांनी आपले शिक्षण संपविले आणि आपला वंशपरंपरागत फुलमाळ्याचा धंदा सुरू केला. याच सुमारास जोतीच्या जीवनाला नव्या विचारांची कलाटणी मिळाली. ब्रिटिशांचे राज्य उलथून पाडण्याच्या विचाराचे प्राधान्य कमी झाले. तो प्रसंग असा : एका ब्राह्मण स्नेह्याच्या लग्नाचे आमंत्रण आले. जोती त्या लग्नास गेला. नवरा मुलगा नवरीकडे वऱ्हाडी मंडळीसहित मिरवत जात होता. त्या मिरवणुकीत दुसऱ्या जातीचे लोक नव्हते. असा हा जातिभेद निरनिराळ्या प्रसंगी हिंदूंच्या निरनिराळ्या समारंभात आतापर्यंत प्रकट होत होता. काही ब्राह्मणांच्या ही गोष्ट लक्षात आली की एक ब्राह्मणेतर व्यक्ती या मिरवणुकीत चालला आहे. एक गर्विष्ठ ब्राह्मण जोतीवर खेकसून म्हणाला, ''अरे, तू आमच्या बरोबरीने या मिरवणुकीत कसा सामील झालास ? तू बाजूला हो.'' या इशाऱ्याने जोतीचा भयंकर पाणउतारा झाला. हे अपमानकारक शब्द जिव्हारी झोंबले. तो घरी परतला. वडिलांच्या कानावर त्याने ही अपमानास्पद घटना घातली. तेव्हा जोतीचे वडील म्हणाले, ''अरे, ही गोष्ट मनाला



लावून घेऊ नये. प्रत्येक जातीने आपापला दर्जा ओळखून वागावे.'' त्या काळच्या सामाजिक जीवनाचा आणि हिंदू समाजरचनेचा अर्थ जोतीरावांच्या अंत:चक्षुपुढे प्रकट झाला. सगळे हिंदू जरी एकाच धर्माचे असले, तरी धार्मिक जीवन निर्माण करण्यात हिंदुत्व हे असमर्थ ठरले आहे. एकात्मता या हिंदुत्वाने निर्माण केली नाही. अशा तऱ्हेचे सामाजिक विषमता व उच्चनीचता जोपासणारे हे हिंदुत्व. ब्राह्मणेतर वर्गाच्या लोकांना ज्ञानाचे दरवाजे खुले झाले; परंतु या उत्कृष्ट संधीचा फायदा ब्राह्मणेतर उत्साहाने घेत नव्हते. आधुनिक शिक्षणाच्या प्रभावाखाली समाजपरिवर्तन होऊ शकेल, या विचाराने जोतीराव मात्र भारावून गेले होते.

## दोन

# स्त्रिया आणि शूद्र यांचे शिक्षण

जोतीरावांनी पहिला महत्त्वाचा कार्यक्रम ठरविला तो म्हणजे शिक्षण. हिंदू समाजातील स्त्रिया व शूद्र या दोघांनाही आधुनिक ज्ञान प्राप्त व्हावयास पाहिजे याची त्यांना निश्चिती झाली. त्या वेळी ब्राह्मणसुद्धा स्त्रीशिक्षणाच्या विरुद्ध होते. मुलींकरता एक शाळा काढावी असे जोतीरावांनी ठरविले. स्त्री शिक्षित झाली, तर घर हे शाळा बनते; कारण आई ही मुलांची गुरू बनते. मुलींची शाळा उघडण्याच्या विचारात असता त्यांचे परमस्नेही सदाशिवराव गोवंडे यांनी आपल्याबरोबर जोतीरावांना अहमदनगर येथे नेले. अहमदनगर हे ख्रिस्ती मिशनऱ्यांचे शिक्षण केंद्र होते. तेथे गेल्यावर गोवंडे व जोतीराव यांनी फॅरारबाईंच्या मिशन शाळेला भेट दिली. हिंदुस्थानात स्त्रीशिक्षणाकडे दुर्लक्ष होते याबद्दल फॅरारबाईंनी दुःख व्यक्त केले. प्रत्येकाने आपल्या पत्नीस शिक्षण देऊन शिक्षणप्रसारात तिने पतीला मदत करावी, असे फॅरारबाईंचे मत होते. त्याप्रमाणे जोतीराव पुण्यास परत आल्यावर त्यांनी आपल्या पत्नी सावित्रीबाई यांना शिक्षण घ्यावयाची प्रेरणा दिली. त्या शिकल्या व कनिष्ठ वर्गातील मुलींसाठी त्यांनी शाळा उघडली. जोतीबांची शाळा बुधवार पेठेतील भिडे वाड्यात ऑगस्ट 1848 मध्ये सुरू झाली. जोतीरावांचे सहकारी परांजपे, हाटे व गोवंडे यांनी शाळा चालविण्यासाठी आर्थिक साहाय्य दिले. ही शाळा महार-मांग चांभारादी अस्पृश्यांच्या मुलींनाही प्रवेश देत होती. सगळा हिंदू समाजच परंपरेच्या अंधश्रद्धेत जखडला गेलेला. अशा अंधश्रद्ध हिंदू नेत्यांचा एक बालेकिल्ला म्हणजे पुणे शहर. शूद्र व अतिशूद्र जातीतील स्त्रियांना शिक्षण देणारी संस्था म्हणजे या वरिष्ठ नेत्यांना भ्रष्टाचार वाटला. देव, धर्म व समाज यांच्या विरुद्ध हे वर्तन वाटले. स्त्रिया व शूद्र यांना विद्येचा अधिकार नाही, असा हिंदू धर्माचा सिद्धान्त आहे असे वरिष्ठांना वाटत होते. वास्तविक हिंदू धर्मशास्त्राने स्त्री व शूद्रांना फक्त वेद शिकण्याचा अधिकार नाकारला आहे. स्त्रिया व खालचे वर्ग यांना विद्या नाकारली नाही. पण धर्मशास्त्राने विद्या नाकारली नसली तरी त्या वर्गाच्या पुढाऱ्यांनी नाकारली. स्त्रिया शिकल्या तर उच्चनीच जातींची समाजसंस्था डळमळीत होईल, अशी भीती ब्राह्मणांना व जातिप्रमुखांना वाटत होती. स्त्री शिकली की कुमार्गास लागून सुखाचे वाटोळे करील, असे वाटत होते. त्या वेळी स्त्रियांनी पायात पादत्राणे घालणे, छत्री वापरणे, नवऱ्याशी



इतरांदेखत बोलणे, नव्या जोडप्याने वडीलधाऱ्यांदेखत गप्पा मारणे अशा तऱ्हेच्या गोष्टी होऊ देत नसत. स्त्रीने स्वतःच्या नवऱ्याच्या पंक्तीत बसणे अपमानकारक मानत. स्त्रीला शिक्षण देणे म्हणजे वेड्याच्या हाती कोलीत देण्यासारखे आहे, असे वाटे. शिक्षणाच्या योगाने कौटुंबिक जीवनात एकमेकांच्या मर्यादा पाळण्याची प्रवृत्ती राहणार नाही; सासरा व सासू यांचा अधिकार राहणार नाही असे वाटत होते. अशी ही विचारपद्धती जीवनाला बंधनाने जखडून टाकणारी होती.

जोतीबांनी बुधवार पेठेतील भिड्यांच्या वाड्यात 1848च्या ऑगस्ट महिन्यात मुलींची शाळा काढली. त्यात अस्पृश्यांच्या महार-मांगांच्या मुलींनाही प्रवेश मिळाला. ही गोष्ट ब्राह्मणांनाच नव्हे; तर इतर जातींच्या पुढाऱ्यांनाही नापसंत होती. जोतीरावांचे पिता गोविंदराव फुले हे जोतीरावांच्या या कृतीने अस्वस्थ झाले. ते श्रद्धाळू होते. सामाजिक चालीरीती आणि परंपरा यांच्यातील योग्य काय व अयोग्य काय, याचा विवेक दुर्लभ होता. फुलमाळी समाजाने गोविंदरावांना हे पटविले, की जोतीराव धर्माविरुद्ध आचरण करीत आहेत; जोतीरावांनी पित्याशी वादविवाद केला; परंतु पित्याचे मन वळले नाही. गोविंदरावच म्हणाले की, ''तुझा मार्ग मोकळा आहे. तू माझ्या घरात राहू नकोस. तू आपल्या बायकोला घेऊन जा.'' सावित्रीबाईसुद्धा जोतीरावांच्या मताची बनली होती. पतीबरोबर वनवास भोगण्याची तयारी तिने केली होती. जोतीरावांनी पत्नीसह पित्याच्या घराला रामराम ठोकला. स्वतंत्रपणे मुलींची शाळा काढणारे जोतीराव हेच पहिले भारतीय होत. जोतीरावांनी काढलेली शाळा प्रथम काही काळ आवश्यक तितकी मदत न मिळाल्याने बंद पडली. आर्थिक परिस्थिती थोडी सुधारल्यावर जोतीरावांनी जुन्या गंज पेठेत गोवंडे या मित्राने दिलेल्या जागेत पुन्हा शाळा सुरू केली. शाळेत मुलींची संख्या वाढत गेली. त्या शाळेत मुलींची संख्या आणखी वाढल्यावर मोठी जागा शोधली. एका मुसलमानाची जागा शाळेसाठी भाड्याने घेतली. मेजर कँडी शाळेला पुस्तके पुरवीत. थोड्या काळात बुधवार पेठेतील अण्णासाहेब चिपळूणकरांच्या वाड्यात 3 जुलै 1851 रोजी जोतीरावांनी मुलींची शाळा काढली.

चिपळूणकर हे एक श्रीमंत गृहस्थ होते. त्या शाळेत विनावेतन दिवसातून चार तास जोतीराव शिकवीत असत. त्यांनी एक कार्यकारी मंडळ स्थापले. मंडळाच्या स्वाधीन ती शाळा केली. त्या मंडळात केशव शिवराम भवाळकर, अण्णा सहस्रबुद्धे, बापूरावजी मांडे, विष्णु भिडे, कृष्णशास्त्री चिपळूणकर व विष्णुशास्त्री पंडित होते. विष्णुशास्त्री पंडित पुढे विधवा विवाहांचे कैवारी म्हणून गाजले. बुधवार पेठेतील चिपळूणकरांच्या वाड्यात शाळा सुरू झाली त्याच्या पहिल्या दिवशी पटावर आठ मुली होत्या. त्यांची संख्या लवकरच 48 झाली. कार्यकारी मंडळाची आर्थिक स्थिती बरी नसल्याने जोतीरावांच्या पत्नी विनावेतन अध्यापनाचे काम करू लागल्या. मुख्याध्यापिका सावित्रीबाई फुले झाल्या. जाता-येताना त्यांची थट्टामस्करी होई. म्हणून घरातून शाळेत आणण्यासाठी व

परत पोचवण्यासाठी शिपायाची नेमणूक झाली. संस्थेच्या विद्यमाने जोतीरावांनी 17 सप्टेंबर 1851 ला रास्ता पेठेत दुसरी शाळा काढली व 15 मार्च 1852 ला वेताळ पेठेत तिसरी शाळा काढली. वाचन, व्याकरण, अंकगणित, भूगोल, इतिहास, नकाशा इत्यादी विषयांचा अभ्यासक्रम ठेवला होता. विद्यालयाचे पर्यवेक्षक मेजर कँडी यांनी आपल्या वृत्तान्तात म्हटले, ''मुलींची बुद्धिमत्ता व प्रगती पाहून मला फार समाधान झाले.'' 17 फेब्रुवारी 1852 रोजी जोतीरावांच्या एका शाळेची परीक्षा झाली. परीक्षेनंतर भाऊसाहेब मांडे यांचे भाषण झाले. आपल्या भाषणात ते म्हणाले की, ''आपल्या देशातील नागरिकांना अजून स्त्रियांच्या शिक्षणाचे महत्त्व कळले नाही, याबद्दल वाईट वाटते.'' त्या समारंभास ब्राऊन हे न्यायाधीश उपस्थित होते. त्यांनी भाषणात इंग्रज महाकवी मिल्टनचे उद्गार सांगितले आणि म्हटले, ''घरातील सुख व गृहसंस्थेची उपयुक्तता स्त्रियांच्या शिक्षणाने वृद्धिंगत होईल.''

भारतातील स्त्रीशिक्षणाचा पुरस्कार करणारी एक मोठी शक्ती म्हणून जोतीरावांचा लौकिक झाला. त्या काळी भारतात प्राथमिक शाळांची स्थिती मुळीच समाधानकारक नव्हती. स्थापन झालेल्या प्राथमिक शाळांना लवकरच अवकळा प्राप्त होत असे. आपल्या कार्यासाठी जोतीराव आटोकाट प्रयत्न करत. ते दानशूर व्यक्तींना भेटत, सरकारी उच्चपदस्थांची गाठ घेत असत. जोतीरावांची बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी नावाची शिक्षण मंडळी स्थापन झाली. नाना शंकरशेट हे श्रीमंत गृहस्थ, डॉ. भाऊ दाजी लाड हे विद्वान गृहस्थ हे या शिक्षणप्रसाराच्या कार्यात उत्साहाने भाग घेत. जोतीरावांनी काढलेल्या वेताळ पेठेतील शाळेत महार-मांगांची मुलेसुद्धा शिकण्यास येत. दक्षिणा पारितोषिक समितीकडे अनुदान मागण्यात आले. त्याचा सहानुभूतीने विचार झाला. मेजर कँडी हे त्या समितीचे प्रमुख होते. दक्षिणा पारितोषिक समितीकडून मासिक देणगी मिळू लागल्याने कित्येकांना आनंद झाला, कित्येक मत्सराने पछाडले गेले. जोतीरावांनी वेताळ पेठेत दोन शाळा काढल्या. एक अस्पृश्यांच्या मुलांसाठी व दुसरी मुलींसाठी. त्या शाळेत ब्राह्मण शिक्षकही शिकवण्यासाठी येत.

महार-मांग मुलींच्या शाळेतील एका 14 वर्षाच्या मुलीने निबंध लिहिला. त्यात ती म्हणते, ''ब्राह्मण लोक म्हणतात, की इतर जातीने वेद वाचू नयेत. याचा अर्थ आम्हास धर्मपुस्तक नाही. मग आम्ही धर्मरहित आहोत का ? तर हे भगवान, आम्हाला आमचा धर्म कोणता ते सांग. भगवंता, आम्हावर कृपा करून येथे दयाळू इंग्रजी सरकार पाठवलेस. त्यामुळे आमचा वंशही वाढत चालला. उच्च वर्गातील लोकांचा अपराध केला असता, इंग्रजी राज्यापूर्वी महार व मांगाचे डोके मारीत असत. गुलटेकडीच्या बाजारात फिरण्याची मोकळीक नव्हती, ती आता मिळाली.'' जोतीरावांच्या शाळेत तयार झालेली ही मुलगी. यावरून शाळेची प्रगती दिसून येते. एकोणिसाव्या शतकात भारतातील शिक्षण प्रसारांचे जे कार्य झाले, जो इतिहास घडला; त्यात राममोहन रॉय, विल्यम कॅरी, डेव्हिड हॅरी यांच्याबरोबरच जोतीरावांचा निर्देश अटळ आहे.



दादोबा पांडुरंग तर्खडकर हे त्या काळी सरकारी देशी शाळांचे पर्यवेक्षक होते. जोतीरावांनी स्थापलेल्या पहिल्या शाळेची परीक्षा 16 ऑक्टोबर 1851 रोजी बुधवार पेठेत त्यांनी घेतला. इतक्या थोड्या अवधीत शाळेने चांगली क्रांती केली, हे त्या चालकांना भूषणावह आहे, असा त्यांनी अभिप्राय लिहून ठेवला. जोतीबांच्या एका शाळेतील 17 फेब्रुवारी 1852 रोजी जेव्हा प्रकटपणे परीक्षा घेण्यात आली, तो समारंभ पाहण्यासाठी नागरिकांची गर्दी जमली. स्त्रीशिक्षण आणि कनिष्ठ वर्ग यांचा कैवारी म्हणून जोतीरावांचे नाव सर्व महाराष्ट्रात गर्जू लागले. शाळा काढल्यानंतर शाळांतील विद्यार्थ्यांनी आपणासाठी वाचनालय असावे, अशी इच्छा दर्शविली. जोतीरावांनी वाचनालय स्थापण्याच्या कार्यातही यश मिळवले. वाचनालय हे शिक्षण देण्याचे एक महत्त्वाचे साधन आहे. जोतीबांच्या शाळेतील मुलांची पटसंख्या सरकारी शाळातील पटसंख्येपेक्षा दहा पटींनी मोठी झाली. हा जो आश्चर्यकारक बदल झाला याचे कारण, शिकवण्यासाठी आवश्यक असलेली उत्तम व्यवस्था जोतीरावांच्या शाळेत होती. जोतीरावांच्या गौरवार्थ विश्रामबागवाड्यात 16 नोव्हेंबर 1852 रोजी सरकारने देशी सरदार व प्रमुख लोक यांची सभा बोलावली होती. सरकारच्या वतीने जोतीबांना दोनशे रुपयाची एक शालजोडी सन्मानपूर्वक अर्पण करण्यात आली. या समारंभात बापूरावजी मांडे व पुणे महाविद्यालयाचे मुख्य पंडित मोरेश्वरशास्त्री यांनी भाषणे केली. शालजोडीने सन्मान घेण्याचा अधिकार विद्वान ब्राह्मणांचाच होय, अशी तोपर्यंत समजूत होती.

स्त्रीशिक्षणाची ही चळवळ भारताच्या सगळ्या प्रांतात त्या वेळी पसरू लागली. 'स्टुडंट्स लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी' ही संस्था मुंबईत स्थापन झाली. पहिले चार अध्यक्ष युरोपीय होते. एका शाळेत दादाभाई नवरोजी हे शिक्षक होते. मुंबईत या संस्थेतर्फे आठ शाळा 1 ऑक्टोबर 1849 रोजी स्थापन झाल्या. अशा शाळा सर्व जातीच्या मुलांना प्रवेश देत. इंग्रज राज्यपाल व न्यायाधीश अशा शाळांना भेटी देत असत. त्या काळच्या परिस्थितीचे वर्णन करताना लोकहितवादींनी म्हटले आहे, ''ब्राह्मणांनी युक्तीने आपल्या स्वाधीन विद्या ठेवली. इतरांस शिकवू नये, असा धर्म लावून दिला. हल्ली बहुधा सर्व रोजगार ब्राह्मणांनी बळकावले. जर कोणी शूद्र कारकून झाला, तर सर्व ब्राह्मण त्याच्याकडे डोळे वटारून पाहतात. ब्राह्मणेतर विद्यार्थ्यांना संस्कृत ही पवित्र भाषा शिकवण्यापेक्षा आम्ही राजीनामा देऊ, अशी ब्राह्मण पंडितांनी धमकी दिली आहे.'' तेव्हा 'ज्ञानोदय' पत्राने लिहिले की, ''ब्राह्मणांनी अशा विचित्र कल्पनेत रममाण होण्याचे दिवस गेले आहेत.'' गंगाधर फडके नावाचे ब्राह्मण पंडित मुंबईत 1820 ते 1825 पर्यंत युरोपीय लोकांना संस्कृत शिकवून उदरनिर्वाह करीत. ते पुण्याचे होते. पुण्यास परत गेल्यावर त्यांच्यावर ब्राह्मणांनी बहिष्कार टाकला. नीलकंठशास्त्री भट व दुसरे पाच पंडित हे ब्राह्मणेतर विद्यार्थ्यांना संस्कृत शिकवण्यास

तयार नव्हते. तेव्हा त्यांची कमी पगारावर 'ओरिएंटल रिसर्च' मध्ये बदली करण्यात आली. धोंडोशास्त्री डेंग्वेकर, कृष्णशास्त्री राजवाडे या पंडितांनी ब्राह्मणेतर विद्यार्थ्यांना संस्कृत शिकवले, म्हणून पुण्यातील ब्राह्मणांनी त्यांचा अत्यंत छळ केला.

जोतीरावांचे समकालीन दादोबा पांडुरंग हे सामाजिक समतेच्या विचारांचे प्रवर्तक. त्यांची बायबलवर भक्ती होती. दादोबांनी गुजराथी शिक्षकांच्या साहाय्याने 1844 साली सुरत येथे मानवधर्मसभा स्थापन केली व त्यांनीच 1848 साली परमहंस सभा स्थापन केली. राम बाळकृष्ण जयकर हे तिचे अध्यक्ष होते. महाराष्ट्राच्या सामाजिक सुधारणेच्या इतिहासात परमहंस सभेची चळवळ महत्त्वाची आहे. या सभेचे सभासद शेणवी, सोनार, प्रभु, भंडारी इ. जातींचे असत. त्यांचा भरणा सरकारी कचेऱ्यांतून होता. मनुष्याचे बंधुत्व व देवाचे पितृत्व या सिद्धांतावर त्यांचा विश्वास होता. या संस्थेची वाढ झाली. तिचे हजार सभासद होते. जातिनिर्मूलन, बालविवाहाला विरोध करणे, विधवा-विवाहाला चालना देणे व हिंदू धर्मात सामाजिक सुधारणांचा प्रसार करणे ही या संस्थेची उद्दिष्टे होती. या संस्थेच्या शाखा पुणे, नगर, सातारा, धारवाड, बेळगांव व कलकत्ता येथे होत्या. तिचे सभासद युरोपीयांनी केलेला पाव खात. जातीबंधने पाळीत नसत. ही संस्था 1860च्या सुमारास बंद झाली.

जोतीराव शाळांच्या सभेच्या शेवटी प्रार्थना करीत असत. केशवराव भवाळकर यांसारख्या परमहंस सभेच्या सभासदाशी त्यांचे निकटचे संबंध होते. पुढे जोतीरावांनी आपला शिवाजीवरील पोवाडा परमहंस सभेचे अध्यक्ष राम बाळकृष्ण जयकर यांना अर्पण केला.

मुंबईत समाजसुधारकांचे नेते बाळशास्त्री जांभेकर व नाना शंकरशेट हे होते. ख्रिस्ती मिशनरी व ख्रिश्चन धर्म यांचा प्रभाव मुंबई-पुण्यासारख्या शहरांत सर्व जातींच्या व्यक्तींवर पडत असे. नवविचाराचा, पाश्चात्य नवज्ञानाचा व ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या आक्रमक विचारांचा प्रभाव पहिल्या नवशिक्षित पिढीवर होऊ लागला. काहींनी ख्रिस्ती धर्म स्वीकारला. धर्मांतर केलेल्यांना परत धर्मात घेण्याविषयी विशेष चर्चा समाजात सुरू झाली. धर्मांतराने मोठी खळबळ उडाली. धर्मांतर केलेल्यांना परत घेण्याचे प्रयत्न बाळशास्त्री जांभेकर व नाना शंकरशेट यांनी केले व ते पुष्कळ अंशी सफल झाले.

या धर्मांतराच्या मुळाशी म्हणजे पतित परिवर्तनाच्या कल्पनेशी जोतीरावांनी आपला संबंध येऊ दिला नाही. व्यक्ती कोणत्या धर्माची आहे, याकडे जोतीराव अतिशय उपेक्षेने पहात होते. एकाच कुटुंबात हिंदू धर्म, ख्रिश्चन धर्म, मुसलमान धर्म, यहुदी धर्म पाळणारे स्त्री-पुरुष असले तरी काही बिघडत नाही, अशा मताचे ते होते.

बहुजन समाजातील शिक्षणाची चळवळ यशस्वी होण्याकडे त्यांचे सगळे लक्ष केंद्रित झाले होते. त्यामुळे त्यांच्या शाळांमधील मुलामुलींचा अभ्यास मोठ्या आस्थेने घेतला जात असे. जोतीरावांच्या शाळांची परीक्षा 21 मार्च 1853 रोजी झाली. मोठा समारंभ



झाला. अनेक कुलीन स्त्रिया व गृहस्थ उपस्थित होते. वाचन, लेखन, व्याकरण, भूगोल, इतिहास इत्यादी विषय कसोशीने या महार-मांगांच्या शाळांमध्ये शिकवले जात. लहुजी मांग व राणोजी महार या शाळेचे प्रचारक बनले. त्यांनी शाळेच्या पटावर मुलांची मोठी भरती केली. देणग्या व वर्गण्या गोळा केल्या. जोतीरावांचे काही सहकारी ब्राह्मण होते. त्यांनी धैर्याने व निःस्वार्थी बुद्धीने त्यांच्या कार्यास पाठिंबा दिला. अस्पृश्यांच्या मुलांना प्रवेश देण्याच्या बाबतीत काही शाळा संचालक कुचराई करत. सरकारच्या कायद्याने असा पक्षपात गुन्हा होता; परंतु या बाबतीत मोठी कोंडी उभारली गेली होती. सरकारने कायदा केला, पण त्यांच्या अमंलबजावणीत कुचराई होती. वरिष्ठ वर्गातील संकुचित वृत्तीचे लोक सहानुभूतिशून्य होते. पण जोतीरावांनी ही कोंडी फोडली. जोतीरावांचे मत असे होते की, कनिष्ठ वर्गातील लोकांना शिक्षण दिल्याने, मानवी मूलभूत हक्कांसाठी झगडण्यास ते तयार होतील. उदरनिर्वाहाचा प्रश्न जोतीरावांना भेडसावत असला तरी ते निःस्वार्थपणे शाळांच्या कार्यात मग्न झाले होते. पत्नीने निष्ठेने साथ दिली; पण वडलांचे घर त्यांना सोडावे लागले होते.

देवाच्या नावे जे समज पसरवलेले होते व ज्या अंधश्रद्धा होत्या, त्या 1855 साली जोतीरावांनी उजेडात आणल्या. काही सुशिक्षित हिंदूंना या नवविचारांकरता अंधश्रद्धांना तोंड द्यावे लागले. जोतीरावांचे आचरण व शिकवणूक ही ब्राह्मणांच्या श्रेष्ठत्वाला धक्का लावणारी एवढेच नव्हे, तर हिंदुधर्माच्या मुळाला जाळून टाकणारी आहे असे लक्षात येऊ लागले. यामुळे काही माथेफिरू अस्वस्थ झाले. पैसे देऊन जोतीरावांना या जगातून नाहीसे करण्याकरता मारेकरी तयार केले. पण ते मारेकरी जोतीरावांच्या घरात घुसल्यावर जोतीरावांशी बातचीत करू लागले. जोतीरावांनी त्यांना विचारले, "मला कशाकरता तुम्ही ठार मारता ? मी तुमचा काही अपराध केला काय ?"

ते मारेकरी म्हणाले, "होय. आम्हाला प्रत्येकी हजार रुपये मिळणार आहेत."

जोतीबा म्हणाले, "ठीक आहे. हे घ्या माझे डोके. तुम्ही गरीब आहात, नाहीतर असे कृत्य करण्यास तयार झाला नसता." जोतीरावांची क्षमाशील वृत्ती पाहून मारेकऱ्यांना ते देवपुरुष वाटले. ते मारेकरी जोतीरावांच्या पाया पडले, त्यांचे सेवक बनले. त्यांपैकी धोंडीराम कुंभार उत्तम शिकला व सत्यशोधक समाजाचा आधारस्तंभ बनला. त्याचे 'वेदाचार' नावाचे पुस्तक प्रसिद्ध झाले. (लेखक : पंडितराव धोंडीराम नामदेव– सन 1896)

भारतातील इंग्रजांचे राज्य उलथून पाडण्यासाठी 10 मे 1857 रोजी मोठे बंड सुरू झाले. त्या क्रांतियुद्धाची रणक्षेत्रे महाराष्ट्राबाहेर होती; परंतु नेते महाराष्ट्रीय होते. या क्रांतियुद्धाने पेट घेण्यास कारण वेगळेच घडले. बंदुकीच्या काडतुसांना गोमातांची व डुकरांची चरबी लावण्यात येई. हिंदी सैनिकांना ख्रिस्ती करण्याचा हा डाव इंग्रज कार्यकर्ते करत आहेत, अशी भावना सैनिकांची झाली. ते असंघटित क्रांतियुद्ध इंग्रजी सैन्याच्या

शिस्तीपुढे अपयशी झाले. इंग्रजांना कसाबसा जय मिळाला. जोतीरावांची मते या बाबबीत वेगळी होती. या क्रांतियुद्धाविषयी ते अत्यंत उदासीन होते. देवाने शूद्रांवर दया करून इंग्रज बहादुरांच्या हातून भट नानाचे बंड मोडले ते बरे झाले, असे जोतीराव म्हणाले. ते म्हणत, ''इंग्रज आज आहेत, उद्या नाहीत. या लोकांचे राज्य आहे तोवर सर्व शूद्रांनी जलदी करून भटांच्या बंधनातून सुटका करून घ्यावी.'' इंग्रजांचे राज्य लयास जाणार या विषयी जोतीरावांची खात्री होती. पण इंग्रज राजवटीचा काळ सामाजिक सुधारणेला पोषक आहे असा त्यांना विश्वास होता. पुढे काही वर्षांनी समाजसुधारक आगरकरांनी हेच म्हटले.

महार– मांग मुलांच्या पुण्यातील शाळांची एक परीक्षा 2 फेब्रुवारी, 1858 रोजी सायंकाळी झाली. प्रतिष्ठित हिंदी व युरोपीयांचा समुदाय त्या वेळी उपस्थित होता. त्या वेळी शाळेचा वृत्तान्त वाचून दाखवण्यात आला. त्यात म्हटले आहे की– कित्येक एतद्देशीय व युरोपीय सद्गृहस्थांनी शाळांना द्यावयाची देणगी व वर्गणी थांबवल्याने संस्थेची आर्थिक स्थिती खालावली आहे. जोतीरावांना शाळागृह बांधता आले नाही; कारण सरकारने संमत केलेली रक्कम मिळाली नाही. महार– मांगांची एक शाळा सरकारी जमिनीवरच्या झोपडीत चाले. 1859 सालच्या प्रतिवृत्तांत दिसते की सरकारी शिक्षणखात्यांच्या संचालकानी दिलेल्या दक्षिणानिधीतून पुण्यातील मुलींच्या चार शाळांना अनुदान गेले होते. शाळा 1869 पर्यंत चालू होत्या.

## तीन

# सामाजिक सुधारणेचे कार्यक्रम

जोतीरावांचे लक्ष शिक्षणसंस्था स्थापल्यावर शिक्षणसंस्थापेक्षा सामाजिक सुधारणेकडे अधिक ओढले गेले. परंपरागत सामाजिक रूढींवर प्रहार करावयास त्यांनी प्रारंभ केला. त्यांच्या अगोदरच बंगालमध्ये राममोहन रॉय यांनी सतीची चाल बंद करण्यासाठी साहाय्य केले. ती चाल 1829 मध्ये बंद झाली. त्या काळी अनेक वेडगळ व निष्ठूर रूढींनी लोकांना ग्रासले होते. परंतु लोहमार्गासारखे दळणवळणाचे नवीन मार्ग, पाश्चात्य शिक्षण व सरकारी अधिकाऱ्यांच्या बदल्या यांमुळे हिंदी अंधश्रद्धांवरील आधारलेल्या चालीरीतींना धका बसला. एकत्र कुटुंबपद्धतीला जोराचा धक्का बसला. नोकरीच्या गावी पत्नीला घेऊन जावे असे सुशिक्षितांना वाटू लागले. मुलींनी शिक्षणास सुरवात केल्याने लग्नाचे वय वाढू लागले. मुलींच्या लग्नाच्या वयोमर्यादेचा विचार होऊ लागला. तरुण विधवांना केशवपन करावे लागे. तिने आपले पुढचे आयुष्य ब्रह्मचर्यावस्थेत कंठावे अशी अपेक्षा होती. प्राचीन काळी हजार-बाराशे वर्षांपूर्वी बालविधवांचे विवाह होत होते. त्यांच्यानंतरच्या काळात ब्राह्मण विधवांचे केशवपन करू लागले. पुढे ती चाल सर्व वरिष्ठ वर्गात पसरली. विधवांचा अमानुष छळ पाहून सरकारने 1829 ला सतीच्या चालीला बंदी केली. विधवांच्या पुनर्विवाहाचा प्रश्न ब्राह्मण व तत्सम जातींशी निगडीत होता. ही त्यांची अवस्था पाहून जोतीरावांचे मन गहिवरले. त्यांनी 1864 साली एका शेणवी विधुराचा पुनर्विवाह केला. तरुण विधवा मोहाला बळी पडत. विधवांना गुप्तपणे बाळंत होण्यासाठी व आपली मुले ठेवण्यासाठी एक बालहत्याप्रतिबंधगृह जोतीरावांनी स्थापन केले. त्यांची ही अशा स्वरूपाची पहिली संस्था होय. ब्राह्मण विधवांना भ्रूणहत्या व दुष्कीर्ती यांपासून वाचवण्यासाठी ही संस्था होती. त्याचा चांगला परिणाम म्हणजे खिस्ती मिशनऱ्यांकडे अशी जी अनाथ मुले जात, ती जाणे बंद झाले.

जोतीरावांचे लग्न होऊन बरीच वर्षे झाली, परंतु मूलबाळ नव्हते. त्यासाठी दुसरे लग्न करावे, असा त्यांच्या सासऱ्यानेच उपदेश केला. जोतीरावांने त्यांचे ऐकले नाही. उलट त्यांनी म्हटले की, ''एखाद्या स्त्रीला पहिल्या नवऱ्यापासून मूल झाले नाही, तर तिने दुसरा नवरा करावा काय ? पुरुषाने पहिल्या पत्नीपासून मूल नाही म्हणून दुसरा विवाह

करावा, ही अत्यंत निष्ठूर चाल आहे.'' जोतीरावांनी आपल्या वडिलांचे अंत्यसंस्कार केले, पण परंपरागत पद्धतीने केले नाहीत. त्यांनी अनाथ-अपंगांना भोजन दिले. वर्षश्राद्धाच्या दिवशी गरिबांना भोजन व विद्यार्थ्यांना पुस्तके वाटली. त्यांच्या पत्नी बालहत्याप्रतिबंधक गृहातील मुलांची वात्सल्याने सेवा करीत. त्यांना स्वत:ला अपत्य नव्हते; पण विधवांनी टाकलेल्या बालकांचे त्या वात्सल्याने संगोपन करीत.

वडिलांच्या मृत्यूनंतर निर्वाहासाठी वस्तुत: त्यांनी सरकारी नोकरी केली असती तर त्यात बढती मिळाली असती; पण लोकसेवा व लोकजागृती हेच कार्य त्यांनी नैतिक जबाबदारी म्हणून पत्करले. काही खाजगी उद्योग करून कुटुंबाकरता ते मिळवीत. खडकवासल्याची बांधकाम योजना सरकारने तयार केली. जोतीरावांनी त्यासाठी दगड पुरवण्याचा ठेका मिळवला. त्यांचे मित्र सखाराम परांजपे हे त्यात भागीदार झाले. उदरनिर्वाहासाठी प्रामाणिकपणे उद्योगधंदा करणे भाग पडले. दगड पुरवण्याचा सरकारशी करार केल्याने जोतीरावांचा संबंध कामगार, सरकारी अधिकारी व विशेषत: अभियंते यांच्याशी आला. कामगारांच्या हिताविषयी कळकळ बाळगणारे जोतीराव हे कामगारांच्या हितार्थ झगडू लागले. कामगारांच्या मनावर असे बिंबवण्याचा प्रयत्न केला की त्यांनी मुलांना शिक्षण द्यावे. कामगारांपुढे ते व्याख्याने देत. जोतीरावांना सरकारी नोकरीतील लबाडीचे व्यवहार दिसत असत. कामगारांना अधिकारी लुबाडतात व सरकारला ठकवतात. अशा अधिकाऱ्यांचे जोतीराव मोठे टीकाकार होते. अधिकाऱ्यांच्या दुर्गुणांवर त्यांनी हल्ले चढविले. युरोपीय अधिकाऱ्यांवरही ते कठोरपणे हल्ला करीत. त्यात केवळ ब्राह्मण समाजाचे लोक नव्हते. या ठेकेदारीच्या धंद्यात संसार चालविण्यात जोतीरावांना पुरेसा पैसा मिळाला. मग त्यांनी आणखी कामे घेतली. येरवडा पुलाच्या बांधकामासाठी चुना पुरविण्याचा ठेका घेतला. तरी ते या कामात काव्ये, ख्रिस्ती मिशनऱ्यांचे हिंदी इतिहासावरील ग्रंथ आवडीने वाचत.

1865 साली 'जातिभेदविवेकसार' हा खळबळ उडवणारा ग्रंथ जोतीरावांनी प्रकाशित केला. त्याचे लेखक जोतीरावांचे स्नेही तुकाराम तात्या पडवळ होत. त्याच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत ग्रंथकर्त्याने म्हटले की, ''हिंदुशास्त्रात जे जातिभेदाचे स्वरूप वर्णिले आहे, त्यामध्ये विपर्यस्त स्वरूपाचा जातिभेदाचा प्रकार आढळतो. तो या हिंदुजनांच्या मनास बांधून टाकतो. जातिभेदाने प्राप्त झालेल्या नीचत्त्वापासून मुक्त करण्यापेक्षा दुसरे कार्य महत्त्वाचे नाही.''

विद्या, ज्ञान व पवित्र आचरण यांचा लेश नसला तरीही ब्राह्मणांनी वंशपरपरेने श्रेष्ठत्व मिळविले. लोकांना अंकित करून आपली सर्व प्रकारे सेवा होण्यासाठी त्यास परलोकसुखाची आशा दाखवणारी पुराणे ब्राह्मणाने लिहिली, हे पडवळांनी पुस्तकात लिहिले. शूद्र जरी जितेंद्रिय वा सदाचारी असला तरी तो श्रेष्ठ नाही, या ब्राह्मणी तत्त्वाचे स्वरूप जातिभेदात आहे. सर्व जग देवांच्या स्वाधीन, ते देव मंत्राच्या स्वाधीन, ते मंत्र



ब्राह्मणांच्या व ब्राह्मण हे माझे दैवत असे देव म्हणतो. पृथ्वीतील सर्व तीर्थे समुद्रात व समुद्रातील तीर्थे ब्राह्मणाच्या उजव्या पायात, अशी श्रद्धा जातिभेदाच्या श्रद्धेचा भाग होता. एवं विश्लेषणयुक्त पडवळांच्या ग्रंथांची पहिली आवृत्ती ऑगस्ट 1861 मध्ये झाली. त्याचे प्रकाशक वासुदेव नवरंगे होते. ते सज्जन गृहस्थ होते. ते प्रथम इंग्लंडमध्ये व्यापार करीत होते. त्यांची पेढी होती. तिचे दिवाळे निघाले. परदेशी व्यापाऱ्यांचे सर्व पैसे चुकते करून ते मुंबईस आले. इथे आल्यावर प्रार्थना समाजाच्या कार्यात उत्साहाने त्यांनी भाग घेतला. 1870 साली त्यांनी एका विधवेशी लग्न केले. नवरंगेंनी जोतीरावांना मुशीच्या धंद्याची आडत लावून दिली. त्यात जोतीरावांना चांगला नफा झाला. सामाजिक समता प्रस्थापनेसाठी महाराष्ट्रात जी सामाजिक व वैचारिक चळवळ झाली त्यात पडवळांनी भाग घेतला. त्यात काही परमहंससभेचे सभासद होते. जातिभेदनिर्मूलनाखेरीज कनिष्ठ वर्गाची दु:खे नाहीशी होणार नाहीत, अशी या लोकांची खात्री होती.

आपल्या ग्रंथाच्या अर्पणपत्रिकेत पडवळ म्हणतात, ''प्रिय स्वदेशबंधूंनो, हा लहानसा ग्रंथ तुम्हास उपयोगी पडेल म्हणून सादर करतो. मुक्काम मुंबई ता. 1 ऑगस्ट 1861, आपला नम्र एक हिंदू.'' 'जातिभेद विवेकसार' या ग्रंथाला जोतीरावांनी प्रकाशक म्हणून नाव मान्य केले कारण त्या ग्रंथात ब्राह्मणांनी जातिभेदाची तटबंदी उभारून, हिंदुधर्माचे कसे तुकडे तुकडे केले, याचे वर्णन आहे. जातिभेद हा सामाजिक समता, स्वातंत्र्य, बुद्धिप्रामाण्य ह्या तत्त्वांशी विसंगत म्हणून त्याचे विसर्जन होणे आवश्यक आहे, या विचाराचे महत्त्व या ग्रंथात विस्ताराने वर्णिले आहे.

बालहत्याप्रतिबंधकगृहात 1873 साली काशीबाई नावाच्या ब्राह्मण विधवेस मुलगा झाला. सावित्रीबाईने त्या मुलाची नाळ कापली. मुलाचे नाव यशवंत ठेवले. त्याचे संगोपन सावित्रीबाईने केले. त्याला त्यांनी आपला मुलगा मानला. सामाजिक सुधारणेच्या चळवळीत उत्साहाने भाग घेणारे सुधारक लोकहितवादी, भांडारकर, मदन श्रीकृष्ण, मामा परमानंद, तुकाराम पडवळ इत्यादींनी जोतीरावांना या कृतीसाठी विशेष धन्यवाद देऊन आदर व्यक्त केला.

1871 ला माधवराव रानडे जोतीबांचे चाहते बनले. जोतीरावांनी अर्भकालय चालवण्यात मिळवलेले यश पाहून रानडे व त्यांचे स्नेही लालशंकर त्रिवेदी यांनी 1875 साली पंढरपूर येथे अर्भकालय सुरू केले. विधवाविवाहाच्या प्रश्नाला चालना देण्याचा जोतीरावांनी आता विचार सुरू केला. विष्णुशास्त्री पंडित यांनी त्यांच्या शिक्षण संस्थेचे सभासद होऊन हातभार लावला व विधवा विवाह संबंधीचे लेख इंदुप्रकाशमध्ये प्रसिद्ध केले. 28 जानेवारी 1866 ला पुनर्विवाहोत्तेजक संस्था विष्णुशास्त्र्यांनी काढली. तिच्या शाखा निघाल्या. पांडुरंग विनायक करमरकर व वेणुबाई यांच्या विवाहाचे आमंत्रण सात ऋषींच्या सहीने पाठवण्यात आले. त्यात समाजसुधारकांचे कैवारी गोपाळ हरि देशमुख,

म. गो. रानडे, विष्णुशास्त्री पंडित, विष्णु परशुराम इत्यादी होते. रा. विष्णुशास्त्री हे महाराष्ट्राचे ईश्वरचंद्र विद्यासागर म्हणून ओळखले जात. ते बोलघेवडे सुधारक नव्हते. करमरकर व वेणुबाई यांच्या विवाहाने महाराष्ट्रात दोन तट पडले. या प्रश्नासंबंधी मोठा विवाद झाला. पण विवाहाच्या बाजूचे बहुमत कमी पडले. प्रतिगामी व परंपरावादी हे नेहमी बहुसंख्यच असतात.

जोतीरावांनी अस्पृश्यता निवारणावरचा विश्वास आत्मकृतीने प्रकट केला. सर्वच समाज त्या वेळी परंपरेच्या बंधनात मनाने सापडला होता. त्याची पर्वा न करता 1868 साली घराजवळील पाण्याचा हौद अस्पृश्यांसाठी खुला केला. त्यांच्यासाठी नगरपालिकेनेही पाण्याची सोय केली नव्हती. उन्हाळ्यात लांबून कोसांवरून पाणी आणावे लागे. आपला हौद अस्पृश्यांसाठी खुला करून जोतीरावांनी मोठे धैर्य दाखवले. त्यामुळे त्यांच्या ज्ञातिबंधूंनी त्यांना वाळीत टाकण्याची धमकी दिली. ''ते ख्रिस्ती झाले,'' असा प्रचार सुरू झाला. फक्त ख्रिस्ती पाद्री अस्पृश्यता विटाळ मानीत नसत. जोतीरावांच्या अंगी इतिहास घडवणाऱ्या पुरुषाचे अपार धैर्य होते. त्यांचा असा विश्वास होती की, आपल्या पाठीशी सत्य उभे आहे.

## चार

# ब्राह्मण आणि अस्पृश्यता यांना विरोध

जोतीराव कवी होते. कवितेला लागणारी शब्दशक्ती त्यांना वश होती. त्यांनी एक पोवाड्याचे पुस्तक प्रसिद्ध केले. त्या पोवाड्यावर 'विविध ज्ञानविस्तार' या मासिकात विरोधी अभिप्राय आला. त्यातील माहिती संशोधकांच्या दृष्टीने चुकीची वाटल्याने त्या मासिकाने जोतीरावांची निंदा केली. जोतीरावांच्या मते ब्राह्मण हेच खरे आर्य, हे आर्य बाहेरून इराणातून येथे भारतात आले; मग येथील मूळ रहिवाशांना म्हणजेच क्षत्रियांना त्यांनी विपन्नावस्थेत लोटले व शूद्र मानले. त्या काळच्या सामाजिक परिस्थितीचे हुबेहूब चित्रण त्यांच्या पुस्तकात होते. सरकारला कर शेतकऱ्यांकडून मिळे. पण सरकारी शाळांत शेतकऱ्यांची मुले जात नसत. ब्राह्मण शिक्षक राजद्रोहाचा प्रचार करीत. जोतीरावांनी आपल्या पोवाड्यात व्हिक्टोरिया राणीला प्रार्थना केली की, ''ब्राह्मणांच्या छळापासून शेतकऱ्यांना वाचवावे. कारकून, शिक्षक यांची इतर जातींच्या लोकातून नेमणूक करावी.'' त्या काळी शिक्षणाच्या बाबतीत ब्राह्मणेतर तरुण शिक्षण घेऊन सरकारी नोकरीत जागा मिळवू लागले. जोतीरावांच्या पोवाड्याचा रोख वरिष्ठ वर्गाच्या विरुद्ध मुख्यतः ब्राह्मणांविरुद्ध होता. जोतीरावांचे या पोवाड्यातील इतिहासाचे विवरण काल्पनिक आहे. ते पुढील पिढ्यांना पटले नाही. त्यांचा पोवाडा आज उपलब्ध नाही. जोतीरावांनी शिवाजी महाराजांवर पोवाडा केला, तो 1869 मध्ये प्रसिद्ध झाला. हा पोवाडा 45 पृष्ठांचा आहे. पोवाडेकर्त्या जोतीरावांनी आपले स्वतःचे वर्णन कुळवाडीभूषण असे केले आहे. या पोवाड्यात जोतीराव गरजतात— शिवाजी महाराजांनी आईच्या प्रेरणेने व निर्भय, एकनिष्ठ शौर्यशाली सहकाऱ्यांच्या साहाय्याने ''रोविला झेंडा हिंदूंचा.'' ''शिवाजी महाराजांनी रामदासाला गुरू केले'' असेही जोतीराव म्हणतात व शेवटच्या कडव्यात सांगतात—

*जिजाबाईचा बाळ काळ झाला यवनाचा*
*पोवाडा गातो शिवाजीचा*
*कुळवाडीभूषण पोवाडा गातो भोसल्याचा*
*छत्रपती शिवाजीचा.*

'ब्राह्मणांचे कसब' या संज्ञेच्या काव्यसंग्रहात जोतीरावांनी म्हटले की अडाणी व देवभोळे शेतकरी भटा-भिक्षुकांच्या सांगण्याप्रमाणे आपली कौटुंबिक धार्मिक कर्मे करीत असतात. त्यात शेतकऱ्यांची पिळवणूक होते. त्या धर्मभोळेपणावर, चालीरीतींवर जोतीरावांनी त्वेषाने हल्ला केला. अलीकडे त्या चालीरीती पुष्कळ कमी झाल्या आहेत. शेतकऱ्याची बायको प्रसूत झाल्यावर भटजी त्याला धार्मिक विधी करण्यास सांगतो. त्यामुळे अपमृत्यू टळेल असे तो म्हणतो. प्रत्येक पोथीत भटाला धनलाभ असतो. सामान्य जनातील लग्ने जुळवणे व मोडणे याची किल्ली भटांच्याच हाती असते. लग्न ठरण्यापूर्वी ज्योतिष पाहिले जाते. अनिष्ट ग्रहशांती करावी लागते. मुलींची बाल्यावस्थेत लग्ने होतात. लग्नानंतर ऋतू प्राप्त झाल्यावर भटजी व इष्ट मित्रांना मेजवानी द्यावी लागते. घर बांधल्यावर गृहप्रवेशाचा समारंभ असतो. त्यात ब्राह्मणाला भोजन व दक्षिणा द्यावी लागते. सुतार, गवंडी हेही मेजवानीला निमंत्रित असतात. निरनिराळ्या ऋतूंमध्ये व निरनिराळ्या धार्मिक व सांस्कृतिक समारंभात देवाची कृपा भटजीतर्फे प्राप्त होते म्हणून पूजाअर्चा करावी लागते. शेतकरी व सामान्य माणूस आजारी पडल्यास वैद्याबरोबर भटजीचेही चालते. शिवलीलामृत, पांडवप्रताप, हरिविजय, रामविजय यांसारखे ग्रंथ आजाऱ्याशेजारी बसून भटजी वाचतो व दक्षिणा उपटतो. घरात कोणी आजारी पडले की जपमंत्राचे पारायण, निरनिराळे होम, अभिषेक वगैरे भटजीकडून सामान्यजन करवून घेतात. कोणी मेल्यानंतर दहाबारा दिवस धार्मिक विधी चालतात. त्यात ब्राह्मणांना दक्षिणा व जातभाईंना भोजन देतात. नवीन करकरीत जोडे, छत्री, वस्तूंचे दान करावे लागते. निरनिराळ्या दानाच्या वेळेस भटजी कर्ज देतो व दस्तऐवज करून घेतो. ग्रहण, संक्रांत व श्राद्धाच्या वेळी भटजी लागतो, इत्यादी माहिती 'ब्राह्मणाचे कसब' ह्या काव्यात जोतीरावांनी सांगितली. हे काव्य त्यांनी स्वत: छापून प्रसिद्ध केले. शिक्षण खात्याकडे त्याच्या प्रती घेण्याची विनंती केली. पण असे पुस्तक वाचनासाठी कोण घेणार? आणि अभ्यासासाठी तर कोणी घेणारच नाही.

वैचारिक धक्का देण्यासाठी जोतीराव नेहमीच पुढे सरसावलेले असत. सात्विक, सौम्य असे सुधारणेचे विचार प्रसृत करणारा प्रार्थनासमाज 31 मार्च 1867 रोजी मुंबईत स्थापन झाला. बंगालमधील ब्राह्मण समाजाचीच ही प्रतिकृती होती. प्रार्थनासमाजच्या स्थापनेत डॉ. आत्माराम तर्खडकर, वामन आबाजी मोडक, म. गो. रानडे व रामकृष्ण गोपाळ भांडारकर ही विद्वान मंडळी होती. पहिल्यांदा सामाजिक सुधारणेच्या बाबतीत त्यांचा विचार-विनिमय होई. परंतु नंतर धार्मिक चिंतनाकडे ते अधिक वळले. प्रार्थना समाज एकेश्वरवादी आणि त्याचे सदस्य जोतीरावांचे चाहते होते. जोतीरावांनी मात्र प्रार्थना समाजाकडे पाठ वळवली.

8 एप्रिल 1870 रोजी उदारमतवादी मंडळींनी 'सार्वजनिक सभा' स्थापन केली. गणेश वासुदेव जोशी ऊर्फ सार्वजनिक काका आणि सदाशिव गोवंडे हे या सभेचे मुख्य



होते. जनतेची वृत्तपत्रातून गाऱ्हाणी जाहीर करणे व सरकारकडे मांडणे हा उद्देश होता. मोरो विठ्ठल वाळवेकर आणि सखाराम यशवंत परांजपे हे जोतीरावांचे स्नेही कामधंद्याच्या निमित्ताने मुंबईस जाऊन राहिले. लोकांची गाऱ्हाणी व दु:खे सरकारपुढे मांडून ती सरकारकडून निवारण्यासाठी सार्वजनिक सभेच्या वतीने ही मंडळी प्रयत्न करीत. लॉर्ड लिटन याने वृत्तपत्रांची गळचेपी करण्यास काढलेल्या निर्बंधाविरुद्ध भारतीय वृत्तपत्रांची मोठी संघटना या मंडळीने केली. त्याबरोबर परदेशी वस्तूऐवजी स्वदेशी वस्तू वापराव्यात, अशा प्रचारास प्रारंभ केला.

सार्वजनिक सभा ही पुण्यातील पहिली राजकीय संस्था नव्हती. 1852 सालच्या पूर्वार्धात डेक्कन असोसिएशन ही राजकीय संस्था पुण्यात स्थापन झाली. ही महाराष्ट्रातील पहिली राजकीय संस्था. आधुनिक सुशिक्षित त्यात भाग घेत व इंग्लंडातील राज्यकर्त्यांकडे लोकांची गाऱ्हाणी मांडत होते. पूना असोसिएशन नावाची दुसरी एक राजकीय संस्था पुण्यात 1867 च्या दरम्यान स्थापण्यात आली होती. जोतीरावांच्या काळातील अशा सभांवर जोतीरावांचा काडीचाही विश्वास नव्हता. कारण त्या संस्था वरिष्ठ वर्गाच्या गाऱ्हाण्यांच्या बाबतीतच लक्ष घालताना आढळत. कनिष्ठ वर्गाची दु:खे समजावून घेऊन ती सरकारपुढे मांडण्याचे अगत्य कोणीही दाखवत नसे.

श्री. म. गो. रानडे हे मोठे विचारवंत आणि दूरदृष्टीचे नेते त्या काळी उदयास आले होते. तत्कालीन भारतीय विचारवंत व सुधारक यांचे ते अग्रणी होते. जोतीरावांच्या घरी रानडे जात येत असत व जोतीरावही त्यांचे आदरातिथ्य करीत. रानडे जोतीरावांच्या कार्याविषयी विशेष उत्साह दाखवत. ते दोघेही धर्मसुधारणा व समाजसुधारणा यांचे प्रमुख पुरस्कर्ते होते. समाजातील परंपरेला दृढ चिकटून राहण्याची प्रवृत्ती आत्मविकासाला प्रतिबंध करते म्हणून समाजाची नवीन पायावर उभारणी करणे आवश्यक आहे हे दोघांचे मत होते. जोतीरावांचे मुख्य उद्दिष्ट समाजाचा जीर्ण पाया उखडणे हे होते.

कनिष्ठ वर्गातील लोकांचे अज्ञान, निरक्षरता, दूषित पूर्वग्रह आणि जातिविषयक दृढबंधने ही दूर करून परंपरेच्या मानसिक गुलामगिरीतून व ब्राह्मणांच्या प्रभावातून कनिष्ठ वर्गाला मुक्त करावे असा त्यांचा विचार होता. त्यासाठी त्यांनी लेखन केले व पुस्तिका लिहिल्या. 1872 साली त्यांनी 'गुलामगिरी' हा आपला ग्रंथ लिहिला. त्यातील पहिल्या भागात परशुरामाला आवाहन केले. कारण ब्राह्मणनिर्मित ग्रंथांत व पुराणात तो चिरंजीव मानण्यात आला. त्याला त्यांनी लोकांसमोर पुन्हा येऊन उभे राहण्याविषयी आवाहन केले. जोतीरावांनी आव्हान देणारे दोन जाहीरनामे प्रसिद्ध केले. ते जाहीरनामे (ब्राम्हणी धर्माच्या आडपडद्यात) 'गुलामगिरी' या ग्रंथात प्रसिद्ध झाले. स्वातंत्र्य, समता व बंधुत्व या मूलभूत मानवी मूल्यांचा म्हणजे फ्रेंच राज्यक्रांतीने जाहीर केलेल्या आदर्शांचा त्यात पुरस्कार केला आहे. अब्राहम लिंकन याने अमेरिकन गुलामगिरी 1863

साली नष्ट केली. या थोर मानवी स्वातंत्र्याच्या पुरस्कर्त्यापासून स्फूर्ती घेऊन जोतीरावांनी आपला ग्रंथ अमेरिकेतील निग्रोंना अर्पण केला.

'गुलामगिरी' या ग्रंथाचा प्रारंभ होमरच्या प्रसिद्ध वाक्याने झाला तो असा, ''ज्या दिवशी मनुष्य दास होतो, त्या दिवशी त्याचा अर्धा सद्‌गुण जातो.'' हा ग्रंथ प्रश्नोत्तररूपात आहे. त्यात सोळा प्रकरणे आहेत. पहिल्या नऊ प्रकरणात भारतातील ब्राह्मणी वर्चस्वाचा इतिहास आहे. जोतीराव आत्मविश्वासपूर्वक त्यात म्हणतात- ''शूद्र लोक हेच या देशाचे जीवन आहे. आर्थिक व राजकीय संकटांच्या वेळी सरकारने त्यांच्यावर अवलबूंन राहावे, ब्राह्मणांवर नव्हे. जर शूद्रांच्या मनात सुख, समाधान निर्माण केले; तर त्यांच्या निष्ठेविषयी सरकार साशंक राहणार नाही.'' यास्तव जोतीरावांनी सार्वजनिक शिक्षणाविषयी मागणी केली.

जोतीरावांनी जो ब्राह्मणांचा व आर्यांचा इतिहास लिहिला, तो काल्पनिक आहे ! ते संशोधक नव्हते; भाषाशास्त्रज्ञ नव्हते; परंतु सामाजिक क्रांतीचे पुरस्कर्ते होते.

जोतीरावांनी 'गुलामगिरी' या ग्रंथात आपल्या ग्रंथाचे प्रयोजन सांगितले आहे ते असे की— ''ब्राह्मण लोक तुम्हाला लुटून खात आहेत, हे माझ्या शूद्र बांधवांना सांगण्याच्या हेतूने मी हा प्रस्तुत ग्रंथ लिहीत आहे.'' अमेरिकन संस्थानातील निग्रो लोकांच्या स्वातंत्र्यासाठी जो मोठा लढा झाला, त्यापासून सामाजिक न्यायासाठी झगडण्याची स्फूर्ती जोतीरावांनी घेतली. लोकहितवादींवरही अमेरिकन स्वातंत्र्य-समराचा परिणाम झालेला दिसतो. जेव्हा हिंदू स्वत:चे राज्य करण्यास पात्र होतील, तेव्हा ब्रिटिशांनी त्यांना सत्ता दिली नाही तर, जसे अमेरिकेत घडले तसे हिंदुस्थानात घडेल, असे त्यांनी भाकीत केले होते. अमेरिकेच्या स्वातंत्र्य समराचा व गुलामगिरी नष्ट करण्याच्या जाहीरनाम्याचा जोतीरावांच्या पिढीवर फार मोठा परिणाम झाला होता.

'गुलामगिरी' हा ग्रंथ लिहून झाल्यावर जोतीरावांनी सार्वजनिक चळवळीस आरंभ करण्याचा निर्धार केला. ग्रंथ पुरा होण्यापूर्वी जाहीर सभा, पत्रके व पुस्तिका याद्वारे ते आपले विचार व्यक्त करीत होत. आपली चळवळ संघटित करून आपला संदेश सर्व ठिकाणी पोचवावा, अशा निर्धाराने व ध्येयाने त्यांनी सत्यशोधक समाज स्थापला. समाजसुधारणेची महाराष्ट्रातील ही पहिली चळवळ. या समाजाचे पहिले अध्यक्ष व कोषाध्यक्ष म्हणून जोतिराव ठरले. नारायणराव गोविंदराव कडलग यांची कार्यवाह म्हणून निवड झाली. शूद्रांना व अतिशूद्रांना नागरी हक्क जाणीव व अधिकारांची शिकवणूक व ब्राह्मणी शास्त्रांच्या धार्मिक व मानसिक गुलामगिरीतून मुक्तता हे सत्यशोधकाचे ध्येय होते. या समाजाचे सभासद होताना शपथ घ्यावी लागे. खंडेराव या दैवतापुढे बेलपत्र उचलावे लागे. इंग्रज सत्तेशी निष्ठेने वागेन, अशी शपथ घ्यावी लागे. सत्यशोधक समाजानंतर बत्तीस वर्षांनी स्थापन झालेल्या गोपाळ कृष्ण गोखले यांच्या भारत सेवक समाजाने ब्रिटिशांचा हिंदुस्थानशी आलेला संबंध हा देवाच्या अतर्क्य कृपेमुळे आला असे



मानले. त्या काळी शहरातील पाश्चात्य शिक्षण घेतलेले मूठभर लोक राजकीयदृष्ट्या विचार करीत. 1911 साली सत्यशोधक समाजाचे ठराव प्रसिद्ध झाले. त्यात सत्यशोधक समाजप्रणीत महत्त्वाची तीन तत्त्वे सांगितली आहेत. ती अशी : ''(अ) सर्व माणसे एकाच देवांची लेकरे आहेत. (ब) आईला भेटण्यास वा बापाला प्रसन्न करण्यास ज्याप्रमाणे मध्यस्थाची गरज नसते, त्याप्रमाणे देवाची प्रार्थना करण्यास पुरोहित वा गुरूची आवश्यकता नाही. सर्व मानवप्राणी एकाच देवाची लेकरे आहेत, सबब माझी भावंडे आहेत अशा बुद्धीने मी वागेन. परमेश्वराची पूजा, भक्ती वा ध्यानधारणा करतेवेळी मी मध्यस्थाची गरज ठेवणार नाही. दुसऱ्यांनाही तसेच वागवण्याबद्दल उपदेश करीन. आणि (क) मुलामुलींना सुशिक्षित करीन. परमेश्वरास साक्ष ठेवून मी ही प्रतिज्ञा करतो. या प्रमाणे वागण्यास मला सामर्थ्य येईल अशा प्रकारे आयुष्यक्रम गुदरण्यास परमेश्वर सामर्थ्य देवो.''

'समाजाचे' सभासदत्व सर्व जातीतील लोकांना मोकळे होते. ब्राह्मण, महार, मांग इ. त्या आरंभी समाजाचे सभासद होते. ज्या ठिकाणी समाजाच्या शाखा स्थापण्यात आल्या तेथे दर आठवड्यात सभा होत. पुण्यात सोमवार पेठेत डॉ. गावडे यांच्याकडे सभा होई. तेथे दारूबंदी, सक्तीचे शिक्षण, स्वदेशी वस्तू वापरणे, ब्राह्मणांची पुरोहितगिरी झुगारून देणे, लग्न अल्प खर्चात करण्याची व्यवस्था करणे, ज्योतिष, भुते, समंध यांच्या भीतीपासून लोकांना मुक्त करणे इ. वर चर्चा होई. परमेश्वराचे जनकत्व व मनुष्यांचे बंधुत्व यावर भर देण्यात येई.

प्रार्थना समाज व ब्राह्मोसमाज हे एकेश्वरी पंथ होते. तसा सत्यशोधक समाजही होता. या तिन्ही संस्थांच्या मते सर्व मानव एकाच देवाची बालके होत. या तिन्ही संस्था दर आठवड्यास सांघिक प्रार्थना व सभा घेत. राममोहन रॉय यांनी ब्रह्मतत्त्व घेतले. प्रार्थना समाजाने प्रार्थना व जोतीरावांनी सत्य तत्त्व घेऊन कार्याचा पुरस्कार केला. यानंतर दोन वर्षांनी दयानंद सरस्वतींनी आर्य तत्त्वाचा पुरस्कार केला. ब्राह्म व प्रार्थना समाजवादी आपल्या आध्यात्मिक उन्नतीसाठी प्रार्थना करीत. जोतीरावांचा भर प्रार्थनेवर वा आध्यात्मिक उन्नतीवर नव्हता.

जोतीरावांच्या सत्यशोधक समाजाचा जातिव्यवस्थेवर तसाच चातुर्वर्ण्यावरही विश्वास नव्हता. आवश्यक असे धार्मिक विधी ठेवून मध्यस्थाची उचलबांगडी त्याने केली. ब्राह्म समाजही जातिभेद पाळत नसे. प्रार्थना समाजाची तत्त्वे एकूण ब्राह्म समाजासारखी होती. या तिन्ही समाजांनी मूर्तिपूजा त्याज्य ठरवली होती. ब्राह्म समाजात ब्राह्मणानेच प्रार्थना सांगण्याचा प्रथम अलिखित नियम होता. त्या मक्तेदारीला केशवचंद्र सेन यांनी धक्का दिला. ते उत्साही व पक्के सुधारणावादी होते. त्यांनी ब्राह्म समाजाला ब्राह्मणी चिन्हांपासून मुक्त केले. म्हणजे यज्ञोपवीतादींचा त्याग केला.

1867च्या जून महिन्यात भिकोबा दादा चव्हाण या भंडारी शिक्षकाने मुंबईतील

प्रार्थना समाजात पुरोहित म्हणून काम केले. ते साधे व धार्मिक होते. प्रार्थना समाज, आर्य समाज व सत्यशोधक समाज या तिन्ही समाजांनी एक मोठी ऐतिहासिक कामगिरी केली. त्या काळी हिंदुधर्म सोडून ख्रिस्ती धर्माचा स्वीकार करण्याची प्रवृत्ती वाढू लागली होती. तिला आळा पाडला.

सत्यशोधक समाजाची स्थापना झाल्यावर त्याची ध्येये व उद्दिष्टे कृतीत उतरवण्यासाठी जोतीरावांनी प्रत्यक्ष कृतीस आरंभ केला. विद्यार्थ्यांकडून शिष्यवृत्तीसाठी अर्ज मागवले व दहा विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती दिली. याविषयी ब्राह्मणेतर लोकांनी त्यांची प्रशंसा केली. जोतीराव ब्राह्मणांना बोलावल्याशिवाय अनेकांची लग्ने लावू लागले. हे विवाह सत्यशोधक समाजाच्या वतीने होत. वधुवरांना एकमेकांशी निष्ठेने वागण्याच्या शपथा द्यावयाच्या व वऱ्हाडी मंडळींनी वधुवरांना एका सुरात आशीर्वाद द्यायचा. ब्राह्मण भिक्षुकाशिवाय हिंदू विवाह सुरू झाला ही एक आश्चर्यकारक घटना झाली. अशा तऱ्हेचा दुसरा विवाह ग्यानोबा ससाणे या मित्राचा केला. त्याबाबतीत फार धावपळ करावी लागली. या विवाहाने फार खळबळ उडाली. अनेक वृत्तपत्रात "ब्राह्मण पुरोहिताशिवाय हिंदू विवाह" असा मथळा आला. कृष्णराव पांडुरंग भालेकर (1850 - 1910) हे त्या काळचे जोतीरावांच्या पद्धतीने विचार करणारे धीट तरुण पुढारी. ते जातीने फुलमाळी होते. ते सत्यशोधक समाजाच्या चळवळीत सामील झाले व कडवे निर्भय नेते बनले. ते कवी, संपादक व उत्तम वक्ते होते. त्यामुळे या समाजाचा प्रभाव अनेक गावात पसरू लागला व सभासदांची संख्या वाढली. या समाजाच्या कार्यासाठी मुंबईस गेले असता व्यंकू बाळाजी कालेवार व जाया कराडी लिंगू हे त्यांचे भक्त बनले. नरसू सायबू या ठेकेदाराने समाजाला मदत करण्याचे ठरवले. कामाठीपुऱ्यात राहणाऱ्या व्यंकू बाळाजी काळेवार याने समाजास सुमारे बाराशे रुपयांचा कारखाना देणगी म्हणून दिला. कनिष्ठ जातीतील श्रीमंत व वजनदार लोक त्यांच्या ध्वजाखाली गोळा झाले.

पोलसानी राजण्णा लिंगू हे त्या काळी असेच वजनदार गृहस्थ होते. ते तेलुगू माळी समाजातील होते. मुंबईत तेलुगू समाजातील माळी लोकांना कामाठी म्हणतात. व्यंकप्पा अय्यावारू नावाचे दुसरे वजनदार गृहस्थ सत्यशोधक समाजात सामील झाले. पुण्यातील सुप्रसिद्ध धनाढ्य गृहस्थ रामशेट बापूशेट उरवणे हे जोतीरावांना येऊन मिळाले. डॉ. अण्णा नवले यांचे सहाय्यक मारुतराव नवले हे समाजाचे मोठे आधारस्तंभ झाले. या सर्व समाजाच्या चळवळीतील मदतगारांत डॉ. विश्रामजी घोले हे फार महत्वाचे ठरले. ते त्या वेळच्या व्हाइसरॉयचे मानसेवी चिकित्सक म्हणून नेमले गेले होते.

सत्यशोधक समाजाचा पहिला वार्षिक समारंभ थाटाने साजरा करण्यात आला. नारायण तुकाराम नगरकर यांची कार्यवाह म्हणून निवड झाली. भालेकर व उरवणे यांची कार्यकारी मंडळावर निवड झाली. त्यात रामचंद्रराव धामणसकर, संतूजी रामजी लाड व नारायण मेघाजी लोखंडे प्रमुख होते. नारायण लोखंडे हे कामगार चळवळीचे संघटक



बनले. ते कामगार चळवळीचे आद्य जनक झाले. संतूजी वाड (1841 - 1916 रोजी) हे धनगर समाजातील आधुनिक काळातील पहिले थोर पुरुष होत.

सत्यशोधक समाजाच्या कार्याने आणि चळवळीने अनेक विचारवंतांचे लक्ष वेधून घेऊन त्यांना कार्यतत्पर केले. परंतु धडाडीने सुधारणेचा कार्यक्रम अमलात आणणारे सुशिक्षित विरळ होते. सुशिक्षितांचे अग्रणी महादेवराव रानडे भित्रे व पडखाऊ ठरले. त्यांची बहीण विधवा झाली. त्यावर रानडे म्हणाले, "जर विधवा बहिणीचा पुनर्विवाह केला, तर माझ्या वडिलांना अपार दुःख होईल व पुण्यातील ब्राह्मण माझ्यावर बहिष्कार टाकतील." त्यावर जोतीराव म्हणाले, "मग सुधारक म्हणून मिरवू नका." 1873च्या ऑक्टोबरात रानड्यांची प्रथम पत्नी वारली. तिच्या निधनानंतर वयाच्या बत्तिसाव्या वर्षी एका बारा वर्षाच्या मुलीशी रानड्यांनी विवाह केला. या देशातील व महाराष्ट्रातील सुधारक मंडळी या घटनेने खजील झाली. जोतीरावांनी रानडे यांची खरडपट्टी काढली. 'विविधज्ञानविस्तारा'त रानड्यांवर घणाघाती लेख आला. दुसरे मोठे समाजसुधारक लोकहितवादी गोपाळराव देशमुख यांनीही पुराणमतवाद्यांना शरण जाऊन प्रायश्चित घेतले, कारण त्यांनी आपला मुलगा इंग्लंडला पाठवून धर्मबाह्य वर्तन केले, असा त्यांच्यावर ठपका आला होता. धर्मशास्त्रात समुद्रपर्यटन निषिद्ध मानले आहे. अशी ही लोकहितवादींसारख्या अनेक सुधारकांची घसरगुंडी होत होती. 'बोले तैसा चाले' असे सुधारक थोडे होते. परंतु काहींची नावे 'उक्ति तशी कृती करणारे' म्हणून समाज सुधारणेच्या इतिहासात नोंदण्यासारखी दिसतात. उदा. वासुदेव नवरंगे, सदाशिव पांडुरंग केळकर; विष्णुशास्त्री पंडित हे विद्वान चारित्र्यसंपन्न होते. 1874 डिसेंबरमध्ये पहिल्या पत्नीच्या मृत्यूनंतर त्यांनी पुनर्विवाह केला.

महादेवराव रानडे यांच्या आमंत्रणावरून दयानंद सरस्वती जुलै 1875 मध्ये मुंबईहून पुण्यास गेले होते. त्यांनी मुंबईस आर्य समाजाची स्थापना केली. या द्रष्ट्या पुरुषाने उत्तर हिंदुस्थान व बंगालमध्ये विजयी दौरे काढले. अनेक संस्था व व्यक्तींवर त्यांची छाप पडली. सुधारकांना न मानवणारा दयानंद सरस्वतींचा एकच सिद्धांत होता. तो असा की 'वेदात सर्व काही ज्ञान आहे, पण वेदात जातिभेद सांगितलेला नाही.' जातिभेदाची बंधने महाराष्ट्रात अधिक कसोशीने त्यावेळी पाळत होते.त्यामुळे दयानंदांचा आर्य समाज महाराष्ट्रातील जनतेपर्यंत पोचला नाही. पुण्यात दयानंदांची अनेक व्याख्याने झाली. नंतर ते साताऱ्लाही गेले. व्याख्याने झाल्यावर पुण्यात दयानंदांची समारंभपूर्वक मिरवणूक निघाली. ती मिरवणूक पुराणमतवादी मंडळींनी उधळून लावण्याचा प्रयत्न केला. सुधारकांनी जोतीरावांचे साहाय्य घेतले होते. सुशोभित केलेल्या हत्तीवर दयानंदांना बसवण्यात आले. पालखीत पवित्र ग्रंथ ठेवण्यात आले. ताशे, वाजंत्री, शंख मिरवणुकीच्या अग्रभागी वाजत होती. जोतीरावांनी त्या मिरवणुकीत भाग घेतला होता. अनुयायांसह जोतीराव, रानडे व इतर समाजसुधारक मिरवणुकीत सामील झाले होते.

बहुजन समाजातील लोक मिरवणुकीत सामील झाले होते. पुण्यातील पुराणमतवाद्यांनी व गुंडांनी एक गाढव शृंगारून त्याची मिरवणूक काढली. दयानंदांच्या मिरवणुकीबरोबर ती मिरवणूक निघाली व मारामारी सुरू झाली. पण पोलिस बंदोबस्तामुळे लोकांची पांगापांग झाली. दयानंद सरस्वतींचे जीवितकार्य आणि धार्मिक तत्त्वज्ञान विशाल होते. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी या मिरवणुकीची थट्टा केली, कारण त्यांना समाजसुधारणेच्या प्रश्नाचे आकलनच झाले नव्हते.

मध्यंतरीच्या काळात रामचंद्र हरी शिंदे व कृष्णराव भालेकर यांच्या सहकार्याने जोतीरावांनी पुण्यात 'पूना कमर्शियल अँड कन्स्ट्रक्टिंग' ही कंपनी काढली. या कंपनीने पुण्याजवळील खडकवासला कालव्याच्या उजव्या बाजूच्या कामाला दगड पुरवण्याचा ठेका मिळवला. यात त्यांना बराच नफा झाला.

1875 साली सत्यशोधक समाजाचा दुसरा वार्षिक समारंभ साजरा करण्यात आला. यावेळी अध्यक्षपद रामशेट उरवणे यांना दिले गेले. इलय्या सालोमन नावाच्या ज्यूला कार्यकारी मंडळाचा सभासद करून घेतले. या समाजाचे सभासद प्रत्येक रविवारी संध्याकाळी जमत. प्रत्येक पंधरवड्यात एका शनिवारी तत्त्वविषयक व्याख्याने दिली जात. भाषणे करण्याचे कार्यकर्त्यांना वळण लावत. त्याच वर्षी नोव्हेंबर महिन्यात इंग्लंडच्या राजपुत्राने पुण्यास भेट दिली. त्या वेळी सत्यशोधक समाजाच्या एका सभेत धोंडीराम कुंभार व कृष्णराव भालेकर यांनी राजपुत्राच्या सन्मानार्थ गीते गायली. सत्यशोधक समाजात भट-पुरोहितावाचून लग्ने लावीत. ती कायदेशीर होत, असा ज्या वकिलांनी सल्ला दिला, त्यांचे नाव राघवेंद्र राव. सत्यशोधक समाजातर्फे अनेक निबंधस्पर्धा घेतल्या जात. त्यात पहिला विषय 'मूर्तिपूजा उपयुक्त आहे काय ?' व दुसरा विषय 'जातिभेद आवश्यक आहे का ?' स्पर्धकांना बक्षिसे वाटत. ग्रामीण शिक्षण प्रसाराकरता समाजाचे कार्यकर्ते प्रयत्न करत. त्यांनी हडपसरला एक शाळा काढली. हडपसर हे समाजाचे मोठे केंद्र बनले. सत्यशोधक समाजाने चालवलेल्या शिक्षणाच्या प्रसार कार्यासाठी अनेकांनी साहाय्य केले. समाजाच्या सभासदांची संख्या तीनशेपर्यंत गेली. पुणे नगरपालिकेच्या मंडळावर कनिष्ठ वर्गाचे प्रतिनिधी नसल्याने त्यांच्या गाऱ्हाण्यांकडे नगरपालिका लक्ष देत नाही, ही गोष्ट जोतीरावांनी समाजाच्या 1876च्या वार्षिक वृत्तांत नोंदली. वृत्तपत्राकडे, प्रमुख मासिके व नियतकालिकांकडे हा वृत्तांत पाठवला. सत्यशोधक समाजाच्या वृत्तान्तावर विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी 'निबंधमाले'त खरमरीत टीका केली आहे. हिंदू धर्मावर, परंपरेवर, संस्कृतीवर टीका करणाऱ्यांवर चिपळूणकर त्वेषाने तुटून पडत. चिपळूणकरांना या देशातील लोकांचे गेलेले राज्य मिळवायचे होते. उलट सुधारकांना सामाजिक समता, न्याय, वैज्ञानिक दृष्टिकोण यांवर आधारलेले स्वराज्य मिळवायचे होते. ब्राह्म समाज, प्रार्थना समाज, आर्य समाज व सत्यशोधक समाज यांवर चिपळूणकरांनी प्रखर टीका केली.



लोकहितवादींवर एक वर्षभर त्यांनी टीकास्त्र चालू ठेवले. चिपळूणकरांचे भाषेवर प्रभुत्व होते. परंतु सामाजिक विकासाची दृष्टी नव्हती. त्यामुळे जोतीरावांच्या सामाजिक परिवर्तनाच्या प्रश्नाला ते हात घालू शकले नाहीत. चिपळूणकरांच्या लक्षात आले नाही की, त्यांच्या विचारांना भविष्यकाळाची साथ मिळणार नाही. त्यांना वाटले की, सत्यशोधक समाज ही तात्पुरती प्रतिक्रिया आहे. वरिष्ठ जातीच्या प्रभावाचा काळ संपत आला आहे हे त्यांना कळले नाही. जोतीरावांवर टीका करताना ते म्हणतात, ''ब्राह्मण कितीही लबाड व दुष्ट असले तरी ज्ञानभांडाराच्या किल्ल्या त्यांच्या कमरेस आहेत. त्यांच्या साहाय्याशिवाय इतर जातींना ज्ञानाचा लाभ शक्य नाही.'' ते 'समाजा'बद्दल म्हणतात, ''जोतिबांचा समाज अद्याप बाल्यावस्थेत आहे. एकीकडे हडपसर व दुसरीकडे भांबुर्डे या त्यांच्या सीमा होत. असल्या क्षुद्र समाजावर हत्यार उचलण्यास आम्हास उत्साह नाही. स्वामींच्या समाजाप्रमाणे या समाजाचा जेव्हा विस्तार होईल व जोतीरावांचा पुतळा अग्रभागी शुभ्रयशाचा स्मारक म्हणून स्थापला जाईल, तेव्हा त्यांचा विचार करता येईल.'' जोतीरावांचा भविष्यकाळ चिपळूणकरांनी जसा रेखला, तसाच तो खरा ठरला आहे. जोतीरावांचे शुभ्र यश आता दशदिशेला पसरले आहे. चिपळूणकरांच्या ठायी सामाजिक परिवर्तनाची दृष्टी नव्हती. समता व बंधुभाव ही आधुनिक मूल्ये त्यांना ग्रहण झाली नाहीत. चिपळूणकरांनी समाज सुधारकांवर व विशेषतः सत्यशोधक समाजावर कठोरपणे हल्ला केल्याने महाराष्ट्रातील स्वातंत्र्याची चळवळ वाढत असताना, बहुजनसमाजाचे नेते या चळवळीपासून अलिप्त राहिले. 1930 मध्ये म. गांधींनी काँग्रेसचे स्वरूप शेतकरी व अस्पृश्यांना पोषक ठरविल्याने, जोतीरावांचे बहुजनसमाजातील अनुयायी काँग्रेसचे काम करू लागले.

## पाच

# शेतकरी आणि कामगार यांसाठी लढा

1877 सालच्या पूर्वार्धात सत्यशोधक समाजाच्या अनुयायांना बुद्धिप्रामाण्यवाद आणि वैज्ञानिक दृष्टीकोन प्राप्त व्हावा म्हणून, विचारप्रवर्तक व्याख्याने पुणे येथे वेताळ पेठेतील सत्यशोधक समाजगृहात देण्यात आली. चंद्र-सूर्य ग्रहणासंबंधी लोकांचे अंधश्रद्धामय ग्रह नष्ट करण्याकरता ही व्याख्याने झाली. हिंदुस्थानच्या दारिद्र्याच्या प्रश्नावरही व्याख्यान सुरू झाले. निबंध-स्पर्धा व भाषणे यासाठी पारितोषिके होती. वक्तृत्वस्पर्धेसाठी जे विषय ठेवले जात, त्याचा सामाजिक परिवर्तनाशी व बहुजनसमाजाच्या हिताशी जिव्हाळ्याचा संबंध लक्षात घेतलेला दिसतो. 1877 मध्ये जोतीरावांनी सभासदांना एक निवेदन पाठवले. 'समाजा'चे मार्फत व्हिक्टोरिया बालाश्रम स्थापन केला आहे, असे त्या निवेदनात म्हटले. दुष्काळाच्या या दिवसांमध्ये दुष्काळपीडित लोक कुटुंबपोषण करण्यात असमर्थ झाल्याने, मुलांना सोडून जात. मध्यम प्रतीच्या इंदापूर, मिरज, तासगाव यासारख्या गावांमध्ये दुष्काळपीडित मुले मोठ्या प्रमाणात जमू लागली. त्यांना उपास पडले होते, वस्त्रे नव्हती ही गोष्ट जोतीरावांनी निवेदनात सांगितली. 1860 सालापासून दुष्काळ पडत होते. 1875 साली अहमदाबाद, पुणे, सातारा, सोलापूर इत्यादी ठिकाणी शेतकऱ्यांनी बंडे केली. शेतकरी व सावकार यांचे संबंध बिघडल्याने हे दंगे झाले. भवितव्य कठीण दिसू लागले. सावकार लोक शेतकऱ्यांना कर्ज देताना दिलेल्या रकमेपेक्षा अधिक रकमेचा दस्ताऐवज करून घेत. ही ठकबाजी लोकांनी पचू दिली नाही. अनेक वेळा ओरड केली. सरकारने चौकशी मंडळ नेमले. या मंडळाच्या सूचनेप्रमाणे डेक्कन ॲग्रिकल्चरिस्ट रिलीफ ॲक्ट सरकारने संमत केला. सावकार व शेतकरी यांचे संबंध सुधारावे या उद्देशाने या ॲक्टमध्ये अनेक निर्बंध घातले. खतपत्रे प्रामाणिक असावी, शेतकऱ्यांच्या हक्काचे रक्षण व्हावे याकरता तरतुदी होत्या. जोतीरावांचे 'दीनबंधू' नावाचे साप्ताहिक होते. त्याने हे निर्बंध उचलून धरले. शेतकऱ्यांच्या जमिनीस सावकाराने धक्का लावू नये, असे निर्बंध सरकारने घातले होते. अशिक्षितपणा व अज्ञान यामुळे शेतकऱ्यांची फसवणूक होई. अवर्षण वा योग्य वेळी पाऊस न पडणे ही गोष्ट कोणत्या वर्षी घडेल हे सांगता येत नव्हते. महाराष्ट्रात अनेकवार दुष्काळाने कहर उडविला. जोतीरावांनी दुष्काळपीडितांच्या मदतीसाठी पुढाकार घेतला.



अनेक लहान मुलांचे भूकबळी पडत. धनकवडी कँपमध्ये जोतीरावांनी दोन हजार मुलांची सोय केली. दोन ते बारा वयाच्या मुलांना रोज भाकरी देण्यात येई. उरवणे, हरि रावजी चिपळूणकर व पुणे नगरपालिकेचे मुख्य अधिकारी सिनप्पा यांनी साहाय्य केले. 1879च्या अखेरपर्यंत हे काम चालू होते.

1878च्या फेब्रुवारीत जोतीरावांनी निबंधाची स्पर्धा जाहीर केली. निबंधाचा विषय मजेदार होता. ''ज्या शूद्र समाजाने शिवाजी महाराज, शिंदे, होळकर, गायकवाड यासारखे राजे निर्माण केले, तो समाज इतका हतबल झाला की, तो केवळ ब्राह्मणांच्या वस्त्रांचीच निगा राखतो, असे नव्हे, तर त्यांच्या स्त्रियांच्या वस्त्रांचीही निगा राखतो. उलट ब्राह्मण दारिद्र्याने कितीही गांजला, तरी असले हीन दर्जाचे काम स्वीकारवयास तयार होत नाही.''

जोतीरावांच्या पूना कमर्शिअल ॲंड कॉन्ट्रॅक्टिंग कंपनीने दगड पुरवण्याचे काम घेतले होते. परंतु त्यांचे सहकारी रामशेट उरवणे, दीनबंधूकार कृष्णराव भालेकर व शिंदे यांनी त्यांच्या कंपनीची भागीदारी काही काळाने सोडली. जोतीरावांनी ग्यानोबा ससाणे यांना आपल्या धंद्यात येऊन मिळण्याचा आग्रह केला. ग्यानोबांनी सरकारी नोकरी सोडली व ते जोतीरावांना येऊन मिळाले. ग्यानोबांना मोडी, मराठी लिहिता येत असे. ते वक्तशीर व मेहनती होते.

पुणे नगरपालिकेच्या कामकाजात जोतीराव अत्यंत उत्साहाने भाग घेत. सभासदांच्या हक्कांविषयी जोतीराव अत्यंत जागरूक असत. डॉ. घोले व जोतीराव फुले यांचे नगरपालिकेवर विशेष वजन होते.

त्या काळी पुणे शहर एका मोठ्या वादळात सापडले होते. वासुदेव बळवंत फडके यांनी ब्रिटिश सत्तेविरुद्ध बंड केले. लहुजी मांग यांच्याकडे फडकेंनी 1847 साली सैनिकी शिक्षण घेतले. 1879 पर्यंत सर्व महाराष्ट्र या बंडाने हलवून सोडला. देशी व परदेशी वृत्तपत्रे त्या बातमीने थरारली. वासुदेव फडक्यांवर खटला होऊन त्यांना काळ्या पाण्याची शिक्षा झाली. 17 फेब्रुवारी 1883 ला एडन येथील तुरुंगात त्यांचा मृत्यू झाला.

फडक्यांच्या सैनिकांना जोतीरावांनी भाकऱ्या पुरवल्या असे लोक म्हणत, पण जोतीरावांनी सार्वजनिक धर्मपुस्तकात फडक्यांचा उल्लेख तिरस्काराने केला आहे. चिपळूणकरांनी त्यांना दरोडेखोर तर रानड्यांनी त्यांना माथेफिरू देशभक्त म्हटले. फडके व जोतीराव यांनी एकाच गुरूपाशी लष्करी शिक्षण घेतले. त्या दोघांचा दाट परिचय होता.

सक्तीचे सार्वत्रिक प्राथमिक शिक्षण सरकारने सुरू करावे अशी मागणी 'दीनबंधू' मधून 1879 च्या शेवटी जोतीरावांनी सतत सुरू केली. सरकारने, 1870 मध्ये

इंग्लंडमध्ये अशा प्राथमिक शाळा सुरू केल्या होत्या. त्याचा प्रतिध्वनी हिंदुस्थानात उठत राहिला. जोतीरावांनी सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाची मागणी सतत सुरू केली; पण त्याला सरकारकडून प्रतिसाद मिळाला नाही. 1890 साली स्कॉटलंडमध्ये व 1889 मध्ये आयर्लंडमध्ये सक्तीचे प्राथमिक शिक्षण सुरू झाले.

खडकवासला येथील कालव्याचे काम झाल्यावर पाणी शेतीसाठी खुले करण्यात आले. शेतकरी त्या पाण्याचा उपयोग करण्यास उत्सुक नव्हते. शेतकऱ्यांना अज्ञानामुळे खत, बियाणे पुरवावे म्हणून जोतीबा मागणी करू लागले. पुण्याजवळील मांजरी येथे जोतीरावांनी आंबराई लावली. जोतीराव नवीन प्रयोगांकडे आकर्षिले जात.

नारायणराव लोखंडे यांचा जन्म ठाणे येथे 1848 साली झाला. माध्यमिक शिक्षण झाल्यावर त्यांनी काही काळ रेल्वे खात्यात व नंतर टपाल खात्यात कारकुनाची नोकरी केली व तीही सोडून मांडवी येथे नंतर कापडगिरणीत ते काम करू लागले. कामगारांच्या अडचणी व कष्ट यांचा त्यांनी अभ्यास केला. जोतीरावांच्या मार्गदर्शनाखाली गिरणी कामगारांचे प्रश्न समजावून घेऊन त्यांचे नेतृत्व ते करू लागले. मुंबईत 7 जुलै 1854 रोजी स्पिनिंग अँड विव्हिंग ही पहिली कंपनी कावसजी दादर या पारशी गृहस्थाने स्थापन केली. काही आठवड्यानंतर माणिकजी पेटिट यांनीही एक गिरणी काढली. अशा रीतीने हा धंदा वाढू लागला. सोराबजी शापूरजी बंगाली हे विद्वान व समाजसुधारक होते. ते गिरणी कामगारांच्या बाजूने मालकांची सहानुभूती जागृत करण्याचा प्रयत्न करत. मार्च 1875 मध्ये कामगारांच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठी सरकारने मंडळ नेमले. त्यांचे सर्व प्रमुख सभासद गिरणीमालक होते. बाल्यावस्थेत असलेल्या कापडधंद्यावर कोणत्याही प्रकारची बंधने लादू नयेत असे त्यांचे मत पडले. लहान मुलांना दिवसभर कष्टाची कामे पडत. स्त्रियांना दिवसभर राबावे लागे. या गोष्टीची या मंडळाने दखल घेतली नाही. यावेळी हिंदुस्थानात एकंदर त्रेपन्न गिरण्या होत्या.

'दीनबंधू'चे संपादक जोतीराव झाले. लोखंड्यांनी दीनबंधूतून कामगार प्रश्नाला वाचा फोडली. पण गिरणीमालकांच्या मंडळाला ते विरोध करीत नसत. लोखंड्यांनी पुढे गिरणी कामगारांच्या चळवळीचे कार्य हाती घेतले आणि भालेकरांनी शेतकऱ्यांचे प्रश्न हाती घेतले.

दिवसाचे चौदा तास कामगारांना हाडाची काडे करून काम करावे लागे. 'दीनबंधू'त या गोष्टीला महत्त्व दिले गेले. कामगारांना एकाच स्थितीत अनेक तास काम करावे लागते ही गोष्ट वारंवार सांगण्यात आली. पण कामगारांना आळीपाळीने मोकळ्या हवेत आम्ही सोडतो असे गिरणीमालक म्हणत. त्यावर 'दीनबंधू'ने उत्तर दिले, कामगारांना गिरणीच्या बाहेर आल्यास प्रत्येकी चार आणे दंड होतो. विश्रांती मिळत नाही. लहान मुले गिरण्यात सर्व वेळ काम करतात. हे सर्व तपासण्यासाठी 1875 साली सरकारने मंडळ नेमले. पण त्या मंडळाने हे सर्व अमान्य केले.



'दीनबंधू' हे एकच नियतकालिक कामगारांच्या प्रश्नावर लढत राहिले होते. विष्णूशास्त्री चिपळूणकरसारख्यांनाही समाजातील कष्ट सोसणाऱ्यांची बाजू लक्षातच आली नाही. 'दीनबंधू' हे कामगारांचे भारतातील पहिले वृत्तपत्र होय. त्या काळी मुंबईतील कामगार बहुतेक सर्व मराठी भाषक होते.

नारायण लोखंडे हिंदुस्थानातील कामगार संघटनेचे आद्य जनक. त्यांनी 1880च्या प्रारंभी 'मिल हँड असो. सोसायटी' स्थापन केली. ती भारतातील कामगारांची पहिली संस्था. लोखंडे तिचे अध्यक्ष होते. गिरणी मालकांनी तिला विरोध केला नाही. फॅक्टरी कमिशन नावाचे मंडळ सरकारने कामगारांची परिस्थिती पाहण्यासाठी नेमले. त्या वेळी लोखंड्यांनी कमिशनवर कामगारांचा प्रतिनिधी नेमण्यासाठी परिषद बोलावली. परिषदेने लोखंड्यांनाच कामगारांचे प्रतिनिधी म्हणून निवडून दिले.

पुणे नगरपालिकेतील जोतीरावांचे कार्य सुरळीतपणे चालले होते. जून 1880 मध्ये हरि रावजी चिपळूणकर यांनी असा ठराव मांडला की, ''नगरपालिकेच्या कार्यकारी मंडळाची निवडणूक दरवर्षी कामकाजाचे वर्ष सुरू होण्यापूर्वी सर्व सभासदांच्या मताने व्हावी.'' या ठरावाला जोतीबांनी पाठिंबा दिला. जोतीराव हे जनहितदक्ष असल्याने या सूचनेने सत्ता एखाद्या कंपूच्या हाती जाणार नाही; हे त्यांनी लक्षात घेतले. जोतीराव निर्भय व नि:स्पृह होते. हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड लिटन हे पुण्याला भेट देणार होते. त्यानिमित्त सर्व शहर सुशोभित करायचे होते. नगरपालिका त्यासाठी पैसा खर्च करणार होती. लिटनसाहेब अरेरावी होते. त्यांनी हिंदुस्थानातील वृत्तपत्राची मुद्रण कायदा जारी करून मुस्कटदाबी केली होती. लोकमत त्यांच्याविरुद्ध क्षुब्ध झाले होते. लिटनसाहेबांच्या सत्काराकरता करावयाच्या शहर शोभेमध्ये एक सहस्र रुपये खर्च करण्यात आले. 32 सभासदांपैकी पैसे खर्च करण्यास 31 सभासदांनी होकार दिला. एकट्या जोतीबांनी खर्चास विरोध केला. व्हाइसरॉयच्या मानपत्रासाठी खर्च करण्याऐवजी गरीब नागरिकांसाठी ती रक्कम खर्च करावी, असे जोतीराव म्हणाले. लॉर्ड लिटनने पुण्यास भेट दिली. त्यांचा सन्मान करण्यात आला. लोकहितविरोधी सूचना धुडकावून लावण्याचा सभासदांना हक्क आहे, हे जोतीरावांनी दाखवून दिले.

दारूच्या व्यसनाला जोतीरावांचा विरोध होता. पुणे नगरपालिकेच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष प्लँकेट यांना 18 जुलै 1880 रोजी जोतीरावांनी एक कडक भाषेत पत्र लिहिले. त्यात म्हणतात, ''नगरपालिकेने बराच पैसा खर्च करून लोकांचे आरोग्य सांभाळण्याच्या उद्देशाने नोकरवर्ग नेमला व आरोग्य खाते चालविले. पुणे शहराला दारूचे गुत्ते परिचित नव्हते. आता भर वस्तीत दारूचे गुत्ते उघडल्याने लोकांच्या नैतिक अध:पाताची बीजे पेरली जात आहेत. त्यामुळे आरोग्य सांभाळणे या नगरपालिकेच्या उद्देशाला बाध येतो. दारूचे गुत्ते उघडल्यापासून दारूबाजी इतक्या प्रचंड प्रमाणात वाढली आहे, की त्यामुळे अनेक कुटुंबाचा नाश झाला व या दुर्गुणाला शहरात

सराईतपणा आला आहे. या व्यसनाच्या प्रचाराला काही प्रमाणात आळा बसावा, म्हणून मी नगरपालिकेला सूचना करतो की, नगरपालिकेने त्यावर ते ज्या प्रमाणात हानी करतात, त्या प्रमाणात कर बसवावा. मला असे कळते की कुठल्याही नगरपालिकेने असा कर बसवला नाही. मात्र त्यावर मध्यवर्ती सरकारचा कर असतो. या बाबतीत नगरपालिकेने चौकशी करावी. माझा हा ठराव सर्वसाधारण सभेपुढे ठेवल्यास मी आभारी होईन.'' या पत्राने खळबळ उडाली. 'ज्ञानप्रकाश'ने जोतीरावांची प्रशंसा केली व त्यांच्या म्हणण्याला पाठिंबा दिला. ज्ञानप्रकाश वृत्तपत्र म्हणते की, ''जोतीरावांनी प्रथमच नगरपालिकेचे लक्ष ज्या विषयाकडे जोराने वेधले तो महत्त्वाचा आहे. त्यांच्या या कृत्याने फुले हे अभिनंदनास पात्र ठरले.'' जोतीरावांना पत्राची पोच अध्यक्ष प्लँकेटकडून मिळाली. पहिल्याच सभेत पत्र ठेवण्यात आले व पुढील ठराव आला, ''हा विषय सभेपुढे ठेवावा की काय, याचा विचार अध्यक्षांनी करावा. मध्यवर्ती सरकारच्या 22 ऑक्टोबर 1877च्या ठरावाने दारूवर कर बसवता येत नाही. सभा अशी आशा व्यक्त करते की, पुण्यातील गुत्त्यांची संख्या कमी करता येणे शक्य होईल.'' कार्यकारी मंडळाचा ठराव व मूळ पत्र नगरपालिकेचे अध्यक्ष रिचेल यांच्या स्वाधीन करण्यात आले. त्यांनी ठराव व पत्र 27 जुलैस हेन्री डिक्सन या अबकारी अधिकाऱ्याकडे अभिप्रायार्थ पाठवले.

डिक्सन यांनी 30 जुलैस शेरा मारून हे प्रकरण परत पाठवले. आपल्या शेऱ्यात ते अबकारी अधिकारी म्हणाले, ''आम्ही नम्रपणे निवेदन करतो की 1873 - 77 पुणे शहरात चार दारूगुत्ते होते. 1877 - 78 पासून सहा दारूगुत्ते राहिल्याने त्यांची संख्या दहा झाली आहे. हे नवे गुत्ते वाढविण्याची परवानगी जिल्हाधिकाऱ्यांना दिली, कारण शहरात ज्या ठिकाणी गुत्ते आहेत, त्या ठिकाणी चोरटा दारूचा सुळसुळाट झाला. चोरट्या दारूला उत्तेजन मिळू नये या उद्देशाने ही गोष्ट करण्यात आली. पुण्याला आलेली चोरटी दारू अशुद्ध व अपायकारक होती. 1874 साली दारूचा खप 15,617 गॅलन होता. तो 1879 मध्ये 22,912 गॅलनपर्यंत वाढला.'' दारूचे व्यसन पुणे शहरात अत्यंत झपाट्याने वाढत होते, हे जिल्हाधिकाऱ्यांना पटले. रिचेल यांनी 8 ऑगस्ट 1880 रोजी पोलिस पर्यवेक्षकाकडे हे प्रकरण धाडले. त्या पोलिस अधिकाऱ्याने 27 ऑगस्ट 1880 रोजी उत्तर धाडले की, ''लोकांमध्ये दारूचे व्यसन वाढत आहे, याचे कारण असे की, पूर्वी श्रीमंत लोक दारू पीत नसावेत व आता त्यांच्यात दारूचे व्यसन शिरले आहे. पण ते गावठी दारू यथेच्छ झोकतात, असे नाही.'' सर्व पत्रव्यवहार जिल्हाधिकारी रिचेल यांनी पुणे नगरपालिकेकडे पाठवला, व त्यावर शेरा मारला की, ''दारूचे गुत्ते वाढविल्याने व्यसन वाढले, असे म्हणता येणार नाही. या व्यसनाच्या प्रसाराला आळा घालण्यासाठी उपाययोजना करता येईल की नाही, हा प्रश्न आहे.'' जोतीरावांच्या पत्रावरील आपल्या ठरावात नगरपालिकेने अशी इच्छा प्रदर्शित केली की भविष्यकाळात हे व्यसन कमी होण्यासाठी प्रयत्न करावेत.



ब्रिटिश राज्यकर्त्यांचे म्हणणे असे की शुद्ध दारूचे व्यसन हे अशुद्ध, गावठी, चोरट्या दारूपेक्षा आरोग्याला कमी धोक्याचे व अपायकारक आहे. दारूचे व्यसन फैलावू नये अशी जोतीरावांची इच्छा होती. वेदकालापासून दारू गाळण्यात येत असे, याविषयी शंका बाळगण्याचे कारण नाही. दारूच्या व्यसनाविरुद्ध ओरड करणारे जोतीराव हे पहिले महाराष्ट्रीय आहेत, असे नाही. 1852 साली साताऱ्यातील लोकांनी दारूचे गुत्ते बंद करण्यासाठी सरकारकडे अर्ज धाडला होता. सी. डब्ल्यू. बेल या अधिकाऱ्याने 1869 साली सरकारच्या अबकारी धोरणाविषयी एक प्रतिवृत्त दिले. त्यात त्याने म्हटले आहे, ''पेशव्यांच्या राजवटीत शेवटी दारूचे व्यसन वाढले होते. त्यापासून उत्पन्न होणारा कर वाढत होता. गुन्हेगारांना कडक शिक्षा ठेवल्या होत्या.''

कोणत्याही धर्मग्रंथात अथपासून इतिपर्यंत संपूर्ण सत्य सांगितलेले नाही. अशी जरी जोतीरावांची धारणा होती, तरी ज्याप्रमाणे ते परंपरागत हिंदू धर्मावर तुटून पडत त्याप्रमाणे ते खिस्ती धर्मावर टीका करीत नसत. त्यांच्या सहकाऱ्यांनी मात्र खिस्ती धर्मावर व खिश्चनांवर टीका केली. खिस्ती पाद्र्यांच्या सेवाभावाचा जोतीरावांच्या मनावर काही काळ पगडा होता; पण तो कालांतराने कमी झाला. जोतीरावांच्या सहकाऱ्यांनी सरकारवर टीका केली. भालेकर व लोखंडे यांनी गिरणी कामगार व शेतकरी यांची जमीनदार, गिरणीमालक व इंग्रजांकडून जी पिळवणूक झाली त्याविरुद्ध ओरड केली. विशेषतः भालेकर यांनी आपल्या पोवाड्यात व काव्यात या अन्यायाविरुद्ध टीका केली आहे.

जोतीरावांचे कार्य व नेतृत्व यांची छाप महाराष्ट्रात अनेक ठिकाणी दिसू लागली. फलटणमधील कार्यकर्त्यांनी त्यांना व्याख्यानास बोलावले. त्यांच्या मुखातून दलितांची दु:खे व गाऱ्हाणी व्यक्त होत. सामाजिक विषमता व जन्मजात प्रतिष्ठा याविरुद्ध त्यांनी त्वेषाने ओरड केली. त्यांच्या काळात असा नेता नव्हता. सामाजिक कार्यकर्त्यांना नवीन युगाची कल्पना देऊन, त्यांची उदासीनता दूर करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. जोतीरावांची चळवळ समाजात मूळ धरू लागलेली पाहताच जमीनदार, सावकार व वरिष्ठ ब्राह्मणवर्ग त्यांच्यावर टीका करू लागले.

# सहा

# हंटर कमिशनला निवेदन

धर्मभोळ्या समजुती व सुस्तपणा यांपासून जनतेची मुक्तता करण्यासाठी महाराष्ट्रात दौरे काढणारे पहिले नामवंत नेते म्हणजे जोतीराव. साहित्यसम्राट न. चिं. केळकर यांनी टिळकचरित्रात म्हटले आहे की, ''1880 साली न्यू इंग्लिश स्कूलचा जन्म होण्यापूर्वी महाराष्ट्रात ब्राह्मणेतर चळवळ सुरू झाली. वरवर पाहता सत्यशोधक समाजाचे स्वरूप ब्राह्मणेतर असे दिसले. समाजसुधारणेची खेड्यात पोचलेली अशी सत्यशोधक समाजाची चळवळ ही पहिलीच चळवळ होय.''

विष्णुशास्त्री चिपळूणकर हे वडिलांच्या मृत्यूनंतर रत्नागिरी येथील नोकरी सोडून पुण्यास परत आले. ती सरकारी नोकरी होती. पुण्यात आल्यावर त्यांनी टिळक, आगरकर यांच्या सहकार्याने न्यू इंग्लिश स्कूल ही शाळा 1880 साली सुरू केली. 1881 साली तिघांनी 'केसरी' हे मराठी व 'मराठा' हे इंग्रजी अशी दोन साप्ताहिके सुरू केली. केसरीचे संपादक आगरकर व मराठ्याचे टिळक होते. विष्णुशास्त्री यांनी 'किताबखाना', 'निबंधमाला' यांकडे लक्ष पुरवले. केसरी व मराठ्याचे संपादक आडपडदा न ठेवता जनतेच्या बाजूने लिहीत.

केसरी सुरू झाल्यावर एक नवे प्रकरण उपस्थित झाले. कोल्हापूर संस्थानच्या गादीसाठी दत्तकपुत्र शिवाजीराजे यांना वेड लागण्याचे काही कारण नसता, वेड लागले अशी शंका उत्पन्न झाली. महाराणींना हाताशी धरून दिवाण माधवराव बर्वे यांनी कारवाई सुरू केली. कोल्हापूर व पुणे येथे याविषयी ओरड झाली. राजपुत्राला नवीन पालकाच्या स्वाधीन करावे अशी मागणी झाली. केसरी व मराठी यांनी या कारस्थानात बर्वे हेच खलपुरुष असे प्रतिपादन केले. बर्व्यांनी या पत्रकावर अब्रुनुकसानीची फिर्याद केली. त्या वेळी जोतीरावांच्या सांगण्यावरून टिळकांना जामीन राहण्यासाठी उरवणे पुढे झाले. टिळकांची बाजू रास्त आहे असे जोतीरावांचे मत होते.

कोल्हापूरच्या खटल्याचा निकाल टिळक-आगरकर यांच्याविरुद्ध लागला. बर्व्यांची त्यांनी माफी मागितली. परंतु बर्व्यांनी माफी अमान्य केली. दोघांना 120 दिवस डोंगरी तुरुंगात कारावास भोगावा लागला. त्यांची सुटका झाल्यावर नारायण लोखंडे व दामोदर



यंदे या दोघांनी त्या तरुण नेत्यांचा मुंबईत जयजयकार केला. जोतीरावांनी टिळक-आगरकर यांच्या स्वागत-समारंभात भाग घेतला, याचे कारण दोघांनी शिवाजीच्या वंशजाची बाजू घेतली. त्यामुळे जोतीरावांना त्याच्याविषयी अभिमान वाटला. आगरकरांनी जोतीरावांचे 'केसरी'तून जाहीररीत्या आभार मानून आपल्याला संकटात साहाय्य केले म्हणून धन्यवाद दिले. सत्यशोधकाचे मुखपत्र 'दीनबंधू' याने टिळक व आगरकर यांच्या सत्काराला उचलून धरले.

जोतीराव व लोखंडे यांनी महाराष्ट्राचे लक्ष रायगडावरील शिवाजी महाराजांच्या समाधीकडे वेधले. ती मोडकळीस आली होती. जोतीरावांनी शिवाजीचा पोवाडा रचला. शिवाजी महाराजांच्या समाधीकडे महाराष्ट्राचे खूप दुर्लक्ष झाले होते. 1885 सालच्या प्रारंभी पुण्यातील हिराबागेत चाफळकर स्वामींच्या अध्यक्षतेखाली सभा भरली. त्या सभेत जोतीराव व पुण्यातील नामांकितांनी भाषणे केली. सिंक्लेअर या जिल्हाधिकाऱ्याने शिवाजी महाराजांची समाधी स्वखर्चाने दुरुस्त केली.

हिंदुस्थानातील शिक्षणविषयक प्रश्नासंबंधी विचार करण्यासाठी सरकारने 1882 साली सर विल्यम हंटर या गृहस्थांच्या अध्यक्षतेखाली चौकशी करून सुधारणा सुचविण्यासाठी मंडळ नेमले. आपल्या उद्देशानुसार सार्वजनिक क्षेत्रातील प्रमुख व्यक्तींच्या भेटीगाठीसाठी हंटर देशभर हिंडत होते. या मंडळास साहाय्य करण्यासाठी ब्रिटिश भारतातील सर्व प्रांतांत एकेक समिती स्थापण्यात आली. या शिक्षण मंडळाने प्रत्येक प्रांतातील शिक्षणविषयक प्रश्नांचा उलगडा करण्याकरता तज्ज्ञांच्या साक्षी घेतल्या. काहींनी लेखी निवेदनाद्वारे आपले विचार समितीला कळवले. अशा निवेदकांपैकी जोतीराव हे एक होते.

न्यू इंग्लिश स्कूलचे पर्यवेक्षक वामन शिवराम आपटे यांनी शिक्षण समितीला सादर केलेल्या निवेदनात प्राथमिक व माध्यमिक शिक्षणाची जबाबदारी लोकांवर सोपवावी अशी मागणी केली. आपल्या निवेदनात ते म्हणतात, ''ख्रिस्ती धर्मोपदेशकाचे शाळा स्थापण्याचे प्रयत्न हे अस्सल स्वदेशी प्रयत्न नाहीत. त्यांचे ध्येयही शुद्ध शैक्षणिक स्वरूपाचे नाही.'' अनेक विद्वान व प्रसिद्ध व्यक्तींनी या समितीपुढे साक्षी दिल्या. त्या साक्षींवरून निष्पन्न होते, की साक्ष देणारांचा मुख्य उद्देश समाजातील बुद्धिमान वर्गाची मिरासदारी उत्पन्न व्हावी हा होता. गरीब ग्रामीण लोकांच्या हिताशी त्यांचा काडीमात्र संबंध नव्हता. वरिष्ठ वर्गांना शिक्षित करणे एवढाच समितीपुढे आलेल्या साक्षीदारांचा उद्देश दिसतो. त्याला अपवाद जोतीराव होते. सरकारने कनिष्ठ वर्गातील लोकांच्या शिक्षणाची आबाळ केली, असे जोतीरावांनी स्पष्ट सांगितले. जोतीरावांनी 19 ऑक्टोबर 1882 रोजी सादर केलेल्या निवेदनात स्वतःचे वर्णन एक व्यापारी, शेतकरी, नगरपिता असे केले आहे. आपल्या निवेदनात त्यांनी स्वतः स्थापन केलेल्या शाळांची व शैक्षणिक कार्याची सविस्तर हकीकत दिली आहे. किती वर्षे आपण शिक्षक म्हणून कार्य केले व

आपले शिक्षणविषयक अनुभव त्यांनी आपल्या निवेदनात दिले. 'गुलामगिरी' या ग्रंथातील काही उतारे देऊन त्यांनी आपल्या निवेदनास प्रारंभ केला.

निवेदनात फुले म्हणतात, ''सरकार असे सुखस्वप्न बाळगत आहे की,वरिष्ठ वर्गातील लोक हे कनिष्ठ वर्गातील लोकांमध्ये शिक्षणाचा प्रसार करतील. हे सुखस्वप्न उराशी बाळगून गरीब शेतकऱ्यांकडून सरकार जो सारा गोळा करते, त्या सर्व वसुलाचे उत्पन्न सरकार वरिष्ठ लोकांच्या शिक्षणावर उधळते. विद्यापीठे श्रीमंतांच्या मुलांना शिक्षण देतात व ऐहिक उन्नती साधण्यासाठी साहाय्य करतात. परंतु त्या विद्यापीठातून आलेल्या सुशिक्षितांनी आपल्या देशबांधवांच्या उन्नतीच्या कार्यात काही भर घातली नाही.

''विद्यापीठातून पदव्या घेऊन बाहेर पडलेल्या तरुणांनी सर्वसाधारण जनतेसाठी काय केले ? आपल्या आयुष्याक्रमाच्या योगे त्यांनी तिच्यावर कोणता परिणाम घडवून आणला ? अभागी व अज्ञानी अशा बांधवांच्या शिक्षणासाठी, स्वत: आपल्या घरी व दुसरीकडे शाळा सुरू केल्या काय ? मग कोणत्या कारणाने असे सांगण्यात येते, की जर लोकांची नैतिक व बौद्धिक पातळी वाढवावयाची तर वरिष्ठ वर्गाचे शिक्षण महत्त्वाचे ठरते ? राष्ट्राच्या कल्याणाची वृद्धी झाली आहे वा नाही हे समजण्याचे एकच साधन, ते म्हणजे महाविद्यालयात किती विद्यार्थी शिक्षण घेतात आणि विश्वविद्यालयीन शिक्षणाचा विस्तार कसा होतो. ज्याप्रमाणे जंगलातील शिकारीविषयक कायदा केल्याने किंवा 10 पौंड कर भरणाऱ्यांना मतदानाचा हक्क दिल्याने घटनेची कल्याणकारकता सिद्ध होत नाही; त्याप्रमाणे विद्यापीठातून रँग्लर बाहेर पडल्याने वा तेथे देशी व्यक्तींची डीन वा प्राक्टर म्हणून नेमणूक केल्याने, ते सारे देशहिताचे आहे असे सिद्ध होत नाही.

''उच्च वर्गाच्या सरकारी शिक्षणपद्धतीची एक ढळढळीत अशी प्रवृत्ती दिसून येते की, सर्व सरकारी वरिष्ठ जागा या ब्राह्मणवर्गाची मक्तेदारी झाल्या आहेत. सरकारला जर जनतेच्या कल्याणाची खरी कळकळ असेल, तर हे अनेक दोष दूर करणे सरकारचे आद्य कर्तव्य आहे. दुसऱ्या जातीच्या काही थोड्या लोकांची नेमणूक करून दिवसेंदिवस ही ब्राह्मणांची मक्तेदारी मर्यादित केली पाहिजे. हे आता शक्य नाही असे लोक म्हणतील. त्यावर आमचे उत्तर असे की, जर सरकारने उच्च शिक्षणाकडे अधिक लक्ष दिले, तर नीतीने व वागणुकीने चांगले लोक तयार करण्यात अडचण पडणार नाही. वरिष्ठ लोक उच्च शिक्षणाची सोय स्वत:च करतील,'' असे जोतीरावांनी निवेदनात म्हटले.

जोतीरावांनी पुढे म्हटले की, ''मुंबई इलाख्यात प्राथमिक शिक्षणाची आबाळ झाली आहे. प्राथमिक शाळांना योग्य ती उपकरणे पुरवण्यात येत नाहीत. सरकार शिक्षणासाठी शेतकऱ्यांकडून कर घेते व तो पैसा ज्या कामासाठी उभा केला जातो, त्या कामासाठी मात्र खर्च होत नाही. या प्रांतातील जवळजवळ नऊ दहा गावे म्हणजे जवळजवळ दहा लाख मुले यांची प्राथमिक शिक्षणाची काही सोय नाही. शेतकऱ्यांचे दारिद्र्य, त्यांच्या



ठायी असलेल्या स्वावलंबनाचा अभाव, सुशिक्षित वर्गावर सर्वस्वी अवलंबून राहण्याची सवय, याला कारण शेतकऱ्यांमधील शिक्षणाची दु:स्थिती. शेतकरी व इतर कनिष्ठ गरीब वर्ग शिक्षणाचा फायदा घेऊ शकत नाहीत. त्यांच्यापैकी थोडीच मुले प्राथमिक व माध्यमिक शाळांत आढळतात. पण ती फार काळ शाळेत टिकत नाहीत; कारण पालक दारिद्र्याने गांजलेले असतात. शेतकरी व गरीब यांना मुले गुरे राखणे व शेतीच्या कामासाठी हवी असतात. त्यांना शाळेत टिकून धरण्यासाठी शिष्यवृत्त्या वा बक्षिसे यांचे प्रलोभन सरकारने ठेवले नाही,'' यासाठी जोतीराव म्हणतात, ''माझे असे मत आहे की, जनतेत प्राथमिक शिक्षण सक्तीचे करावे. मराठी व इंग्रजी यांची आवड नसल्याने मुसलमानही शिक्षणापासून दूर राहिले. जेथे त्यांची भाषा शिकवली जाते अशा तुरळक शाळा आहेत.''

''महार, मांग व अतिशूद्र जातींना जातिभेदाच्या दूषित पूर्वग्रहामुळे शाळेतून वगळण्यात आले. वरिष्ठ वर्गातील मुलांशेजारी त्यांना बसवण्यात येत नसे. त्यांच्यासाठी वेगळ्या शाळा काढल्या. परंतु त्या फक्त मोठ्या शहरांतून आहेत. महारमांगांची पाच हजारांवर वस्ती असलेल्या पुण्यात फक्त एकच शाळा आहे व त्या शाळेत फक्त तीस मुले उपस्थित असतात. शिक्षणखात्याच्या अधिकाऱ्यांना ही गोष्ट भूषणावह नाही. म्हणून मी सरकारला विनंती करतो, की ज्या गावात कनिष्ठ जातीची वस्ती असेल, तेथे वेगळ्या स्वतंत्र शाळा चालू कराव्यात. कारण दूषित पूर्वग्रहाने त्यांना इतर जातीच्या मुलांशेजारी बसता येत नाही.

''शिक्षणाच्या प्रचलित परिस्थितीत विद्यार्थ्यांच्या यशावर शिक्षकाचे वेतन ठरविणे ही गोष्ट गरीब अज्ञानी लोकांत शिक्षणप्रसार करण्याच्या दृष्टीने योग्य नव्हे; कारण खालच्या वर्गात शिक्षणाची आवड निर्माण करण्यात आली नाही. या विद्यार्थ्यांसाठी कुठलाही शिक्षक स्वत:च्या दायित्वावर शाळा चालविणार नाही असे वाटते. कारण त्याला पोटापुरती मिळकत होणार नाही. त्यांच्यासाठी शाळा सुरू करून विशेष प्रलोभने ठेवावीत.

''सरकारी शाळांतून जे शिक्षण देण्यात येते ते पक्क्या पायावर उभारले पाहिजे. विद्यार्थी भावी आयुष्यात व्यवहारोपयोगी ठरले पाहिजेत. अभ्यासक्रम व शिक्षणयंत्रणा यांची आमूलाग्र सुधारणा व्हावयास हवी. शिक्षकांच्या नोकरीचे नियम व अटी सोयीच्या व स्वास्थ्यदायी पाहिजेत. त्यांच्या पगारात व दर्जात वाढ केली पाहिजे. अध्यापनशास्त्राची परीक्षा दिलेल्या शिक्षकांच्याच नेमणुका शाळांत व्हाव्यात.

''प्राथमिक शाळात सध्या जे शिक्षक नेमले आहेत ते बहुतेक ब्राह्मण आहेत. त्यांच्यापैकी काही शिक्षक विद्यालयातून उत्तीर्ण झाले आहेत. काही शिक्षक साधे आहेत. त्यांचे वेतन अगदी निकृष्ट आहे. त्यामुळे त्यांची कामगिरीही तशीच तोकडी व असमाधानकारक होते. सर्वसाधारणपणे ते शिक्षक निरुपयोगी असतात व त्यांच्या

हाताखाली शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची वृत्तीही आळशी बनते. आपले घरगुती धंदे वा मेहनतीचे काम करण्याचे टाळून ते नोकरीच्या शोधात राहतात.

''माझे असे मत झाले की, प्राथमिक शाळांतील शिक्षक शक्यतो अध्यापनाची परीक्षा उत्तीर्ण झालेले पाहिजेत व ते शेतकरी वर्गातील असावेत; कारण ते गरीब मुलांच्या भावना, गरजा लीलेने समजून घेऊन त्यांच्यात सहजपणे मिसळतील. ब्राह्मण शिक्षक धार्मिक पूर्वग्रहांनी त्या मुलांशी मिसळू शकत नाहीत. कनिष्ठ वर्गातील शिक्षक नेमल्याने मुलांवर नैतिक व हितकर असा परिणाम होईल. तसे वरिष्ठ वर्गातील शिक्षक नेमल्याने घडणार नाही. कनिष्ठ वर्गातील शिक्षकांना नांगर धरण्यास व सुताराचे हत्यार चालवण्यास कमीपणाचे वाटत नाही. महार-मांगादी कनिष्ठ वर्गातील लोकांशी हे शिक्षक सहज समरस होतील. त्यांना शेतीचे व आरोग्याचे शिक्षण घ्यावयास हवे.

''जे शिक्षक लायक आहेत, ते अध्यापनाची परीक्षा उत्तीर्ण नसले तरी त्यांना ठेवून घ्यावे. अधिक परीक्षा उत्तीर्ण नसले तरी त्यांना ठेवून घ्यावे. अधिक चांगले शिक्षक मिळविण्यासाठी अधिक वेतन देऊन सुधारणा केली पाहिजे. बारा रुपयांपेक्षा वेतन कमी नसावे. कुलकर्ण्याचे हिशोब तपासण्याचे काम त्यांना द्यावे किंवा दस्तऐवज तयार करण्याचे वा खेड्यातील पोस्टमास्तराचे वा स्टँप विकण्याचे काम देऊन त्यांचा दर्जा वाढवावा. ज्या लोकांमध्ये ते राहतात, त्यांवर ते हितकर वजन पाडतील असा त्यांचा दर्जा वाढवावा. ज्यांच्या शाळेत अधिक मुले उत्तीर्ण होतील, त्यांना उत्तेजन म्हणून मासिक वेतनाशिवाय अधिक विशेष वेतन द्यावे.

''शहरातील अभ्यासक्रमापेक्षा ग्रामीण भागातील अभ्यासक्रम सोपा व सुटसुटीत असावा, पण दैनंदिन व्यवहाराला सोडून नसावा. शेतीचे शास्त्रशुद्ध ज्ञान देण्यासाठी आदर्श शेतीची योजना व्हावी. जर ते आदर्श शेत नीट चालवले, तर देशाचे कल्याण होईल. प्राथमिक व अँग्लो-व्हरनॅक्युलर शाळांत जी पुस्तके आहेत त्यांची पुनर्रचना केली पाहिजे. तांत्रिक, नैतिक, काही उपयुक्त अशा कलांविषयी मधूनमधून वाढत्या प्रमाणात पाठ देण्याची योजना व्हायला हवी.

''उपशिक्षण तपासनीस शाळेला एकदा भेट देतो. ग्रामीण भागातील शाळांची तपासणी वर्षातून चार वेळा वा अधिक वेळा व्हावयास हवी. शाळेच्या तपासणीविषयी पूर्वसूचना न देता, अचानक भेट देणे ही गोष्ट उपयुक्त ठरेल. त्यासाठी जिल्ह्यातील वा खेड्यातील अधिकाऱ्यांवर अवलंबून राहून चालणार नाही. त्यांनी केलेली शाळेची तपासणी बहुधा उथळ व अपूर्ण असते. युरोपीय अधिकाऱ्यांची देखरेख आवश्यक आहे. त्यामुळे शिक्षकांवर वजन पडते.

''(1) प्राथमिक शाळांची संख्या वाढवावी. त्यासाठी ज्या देशी शाळांतून प्रमाणपत्र असलेले शिक्षक आहेत, त्यांना अनुदान द्यावे. (2) शेतकऱ्यांच्या साऱ्याचा अर्धा भाग प्राथमिक शिक्षणावर खर्च व्हावा. (3) नगरपालिकांच्या हद्दीतील शाळा सरकारने स्वखर्चाने चालवाव्या व त्यासाठी योग्य कायदा करावा. (4) सरकारने प्रांतिक वा मध्यवर्ती निधीतून नगरपालिकांना अनुदान देऊन, त्यांनी स्वखर्चाने आपल्या हद्दीतील शाळा चालवाव्यात असे करावे. परंतु शाळांचा कारभार नगरपालिकांच्या हाती सोपवू नये. प्राथमिक व खाजगी इंग्रजी शाळा सरकारी खात्याच्या नियमाप्रमाणे चालतात. त्यांना पैसे असतील तर अनुदान द्यावे. मात्र ते प्रमाण उत्तीर्ण होणाऱ्या मुलांच्या संख्येच्या प्रमाणावर ठेवावे. नगरपालिकांनी शाळांना असे अनुदान देण्यास कायदा करून भाग पाडावे, शिक्षणावर खर्च होणाऱ्या निधीवर शिक्षण संचालकाचे नियंत्रण असावे. जर मंडळावर सुशिक्षितांची नेमणूक झाली, तर त्यांच्या शिक्षणाचा निधी त्यांना द्यावा. सांप्रत मंडळावर पाटील, इनामदार वा दुसऱ्या व्यक्ती निवडल्या जातात, त्यांना निधीवर योग्य नियंत्रण ठेवता येणार नाही.



''प्राथमिक शाळा जुन्या वळणाप्रमाणे ब्राह्मण समाजातील टाकाऊ लोकांनी चालविलेल्या असतात. त्यांना साधे लेखन, वाचन, त्रैराशिक येत नाही. देशी शाळांकरता शिक्षक तयार करण्यासाठी ग्रामीण भागात सोय नाही. जर खेड्यातील शाळांत अध्यापन प्रमाणपत्र मिळवलेले व अध्यापनाचे कार्य पार पाडण्यास लायक शिक्षक असतील, तरच त्या शाळांना अनुदान द्यावे.'' जोतीराव आपल्या निवेदनात पुढे असे म्हणतात : ''अनेक वर्षेपर्यंत शिक्षण खात्यावर सर्व प्रकारे सरकारचेच संपूर्ण नियंत्रण असले पाहिजे. खाजगी माध्यमिक शाळा काढणाऱ्यांना उदरनिर्वाह होईल एवढे उत्पन्न मिळत नाही. त्यांचे प्रयत्न हे शाश्वत स्वरूपाचे होऊ शकत नाहीत. विष्णुशास्त्री चिपळूणकर किंवा भावे यांच्यासारख्यांच्या खाजगी शाळांना भरपूर अनुदान दिले तर त्या शाळा भरीव कार्य करतील. तथापि सरकारी माध्यमिक शाळांची आवश्यकता भासू नये, एवढी त्यांची कार्यशक्ती वाढण्याचा संभव नाही.

''प्रचलित माध्यमिक शिक्षण हे सर्वसामान्यांच्या जीवनाच्या दृष्टीने अव्यवहार्य व अयोग्य आहे. कारकून व शिक्षक निर्माण करणे एवढाच काय तो त्याचा उपयोग. शिक्षक आणि विद्यार्थी हे मॅट्रिक परीक्षेत उगाच गढून जातात. त्या अभ्यासक्रमाला व्यावहारिक स्वरूप नाही. विद्यार्थ्यांना भावी स्वतंत्र जीवनात समर्थ करील, असे ते शिक्षण नसते. जरी प्रवेश परीक्षेकरता बसणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या देशातील ज्ञानप्रसाराची मर्यादा लक्षात घेता मुळीच मोठी नाही, तरी ती संख्या सरकारी नोकऱ्यातील आवश्यकता लक्षात घेता मोठी आहे असे दिसते. जर शिक्षण सर्वांना सक्तीचे असून सर्वांच्या आवाक्यात असते, तर ही संख्या आणखी मोठी झाली असती. तशी ती होईल, अशी मला आशा आहे.

''उच्च शिक्षणाची व्यवस्था अशा रीतीने करावी की, ते घेणे सर्वांना सहज शक्य होईल आणि मॅट्रिक परीक्षेकरता नेमलेल्या विषयांची पुस्तके जशी मद्रास व बंगाल येथे सरकारी गॅझेटमध्ये छापतात, तशी मुंबई सरकारने गॅझेटमध्ये प्रसिद्ध करावीत. असे

करण्याने खासगी विद्यार्थ्यांना उत्तेजन मिळेल आणि ज्ञानप्रसाराच्या दृष्टीने देशाला अधिक साह्य होईल.''

मुंबई विद्यापीठाचा गौरव करून जोतीराव म्हणाले, ''मुंबई विद्यापीठ खाजगी रीतीने शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना परीक्षांना बसावयास देते, हे एक लोकांना मोठे वरदान आहे. उच्च शिक्षणाचेही बाबतीत विद्यापीठांच्या अधिकाऱ्यांकडून असेच वरदान लाभेल, अशी मी आशा करतो. बी.ए.,एम्.ए. या पदव्यांकरिता खाजगीरीत्या केलेला अभ्यास विद्यापीठाने मान्य केला, तर खरेच तरुण लोक खाजगीरीत्या अभ्यास करावयास झटतील. त्यांनी असे केले तर शिक्षण प्रसाराचे पाऊल अधिक पुढे पडेल.'' शिष्यवृत्ती देण्याच्या पद्धतीविषयी जोतीराव म्हणाले की, ''शिष्यवृत्ती देण्याची पद्धत ही अशा रीतीची बनवावी की जिच्या योगाने ज्या वर्गात शिक्षणाची प्रगती झाली नाही, त्या वर्गातील मुलांना काही शिष्यवृत्त्या मिळतील. शिष्यवृत्तीकरिता चढाओढ ठेवून शिष्यवृत्ती देण्याची पद्धत जरी तत्वत: न्याय्य असली, तरी त्यामुळे खालच्या वर्गात शिक्षणप्रसाराला हातभार लागणार नाही. ज्या सुशिक्षित लोकांना सरकारी नोकरी मिळत नाही, त्यांना तांत्रिक किंवा व्यावहारिक अशा तऱ्हेचे शिक्षण न मिळाल्यामुळे हाताने कष्ट करण्याचे किंवा दुसरे रोजगाराचे काम करण्यास त्यांचे मन घेत नाही. म्हणून ज्या सुशिक्षित लोकांना नोकरी नाही अशा सुशिक्षित लोकांची भाऊगर्दी बाजारात झाली आहे. देशातील लोकसंख्या पाहता सांप्रत सुशिक्षित लोकांची संख्या अगदी लहान आहे आणि ही सुशिक्षितांची संख्या शेकडो पटींनी वाढेल, असा काळ दूर नाही आणि ते सर्व उपयुक्त धंदे करण्याच्या वृत्तीचे होतील आणि नोकरीच्या पाठीमागे कोणी जाणार नाही, असा आपण विश्वास बाळगू या. शेवटी मला या शिक्षणविषयक चौकशी समितीपुढे एकच विनंती करायची आहे की त्यांनी मुलींचे शिक्षण मोठ्या प्रमाणावर सुरू करण्यासाठी कृपया काही उपाय योजावेत.''

'शेतकऱ्याचा आसूड' या आपल्या पुस्तकात जोतीरावांनी म्हटले की, ''हंटर शिक्षण मंडळाने शेतकऱ्याच्या साक्षी घेतल्या नाहीत. त्यांनी पारशी, ख्रिश्चन व ब्राह्मण यांच्या साक्षीवर सारा भरवसा ठेवला आणि त्या समितीने या वर्गांनी दिलेली मानपत्रे स्वीकारली. म्हणून त्या मंडळाचे प्रतिवृत्त अशिक्षित व गरीब लोक यांना उपयुक्त होणार नाही.''

पुणे नगरपालिकेच्या समितीपुढे 30 ऑक्टोबर 1882 रोजी पशुवैद्यक महाविद्यालय काढण्याविषयी एक ठराव आला. जोतीरावांनी या विषयाच्या संदर्भात अशी सूचना केली की अशा तऱ्हेचे महाविद्यालय मद्रास नगरपालिका चालवीत असल्यामुळे त्या नगरपालिकेकडे अशा महाविद्यालयासाठी किती खर्च येतो याची चौकशी करावी. जोतीरावांचा ठराव संमत झाला. नगरपालिकेच्या प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या शिष्यवृत्त्यांची संख्या वाढवावी असा दुसरा ठराव नगरपालिकेपुढे चर्चेस



आला. जोतीरावांनी त्यात अशी दुरुस्ती सुचवली की, सरकार आपल्याकडून प्राथमिक शाळा काढून दुसऱ्या संस्थांच्या स्वाधीन करणार किंवा काय याविषयी निर्णय करीपर्यंत तो ठराव अनिर्णीत ठेवावा. मूळ ठराव संमत झाला.

बाजारासाठी एक इमारत बांधावी असा एक ठराव 4 डिसेंबर 1882 रोजी नगरपालिकेकडे चर्चेस आला. त्या ठरावाला अनुकूल असलेले सभासद व अधिकारी तो ठराव विद्यमान सभासदांकडून मान्य करून घेण्याची घाई करीत होते. कारण स्थानिक स्वराज्याच्या कायद्याप्रमाणे नवीन निवडणुकीनंतर नवीन सभासद यावयाचे होते. 3 लक्ष 25 हजार एवढी मोठी रक्कम बाजाराच्या इमारतीसाठी खर्च करू नये असे जोतीराव व हरी रावजी चिपळूणकर यांचे मत होते. इमारतीसाठी 1 लक्ष रु. खर्च करावेत अशी मूळ कल्पना होती. जोतीरावांचे मत असे की तो सर्व पैसा गरीबांच्या शिक्षणासाठी खर्च करावा. दुसऱ्याही तीन उपसूचना मांडण्यात आल्या. परंतु बहुसंख्य मतांनी असा ठराव झाला 2 लक्ष किंमतीची व दोनशे दुकाने ज्यात असतील अशी एक इमारत बांधावी. खाजगीवाले व चिमण्या यांच्या मालकीची मोठी बाग बाजारच्या इमारतीसाठी निश्चित करण्यात आली. केसरीने या ठरावाला जोराचा विरोध केला. अशी महागडी इमारत बाजाराकरिता नको, असे त्या पत्राने मत दिले. सर्व विरोध बाजूला सारून इमारत बांधणीचे काम सुरू करण्यात आले व त्या काळच्या हिंदुस्थानातील 'लॉर्ड रे मंडई' नावाची एक प्रचंड समारत 1885 साली बांधून पूर्ण झाली.

## सात

# शेतकऱ्याचा आसूड

माणसाच्या भौतिक जीवनाचा अन्न वस्त्र उत्पादन हा आधार आहे. म्हणून मानवी समाजातील शेतकरी समाज निरोगी व बळकट असला पाहिजे. आधुनिक समाज हा औद्योगिक क्रांतीच्या आधारावर उभारलेला असतो, परंतु शेतकरी समाजाचे बळ त्याला आवश्यक असते. हा समाजशास्त्रीय तात्विक दृष्टिकोण जोतीरावांनी ध्यानात धरून 'शेतकऱ्याचा आसूड' हा ग्रंथ लिहिला व प्रसिद्ध केला. तो ग्रंथ लिहीत असताना त्याची हस्तलिखित प्रकरणे प्रवासात असताना ते आपल्या चाहत्यांना वाचून दाखवीत असत. सामाजिक कार्यकर्त्यांना व वजनदार व्यक्तिंनाही त्यांनी ती वाचून दाखवली. एप्रिल 1883 मध्ये त्यांनी तो ग्रंथ मुंबईत संपूर्ण वाचून दाखविला. याच सुमारास ते बडोद्यास गेले. बडोद्याचे तरुण महाराज श्री. सयाजीराव गादीवर आल्यानंतर एक तरुण कर्ते पुरुष व मोठे जनहितपरायण म्हणून त्यांची ख्याती पसरत होती. 'शेतकऱ्याचा आसूड' या ग्रंथाची हस्तलिखित प्रकरणे जोतीरावांनी त्यांना वाचून दाखवली. महाराजांनी जोतीरावांना आर्थिक साह्य केले व त्यांना शाल-पागोटे देऊन त्यांचा बहुमान केला. त्यावेळचे व्हाइसरॉय सर फ्रेडरिक हॅमिल्टन टेम्पल, अर्ल ऑफ डफरिन, यांना 28 जुलै 1883 रोजी जोतीरावांनी हस्तलिखित प्रत पाठवली. या ग्रंथाच्या उपोद्घातात जोतीराव म्हणतात----

विद्येविना मति गेली, मतिविना नीती गेली,
नीतिविना गती गेली, गतिविना वित्त गेले,
वित्ताविना शूद्र खचले, इतके अनर्थ एका अविद्येने केले.

उपोद्घातात पुढे म्हटले आहे की- ''सांप्रत शेतकरी म्हटले म्हणजे त्यामध्ये तीन भेद आहेत— शूद्र शेतकरी अथवा कुणबी, माळी व धनगर. मूळचे जे लोक शुद्ध शेतकीवर आपला निर्वाह करू लागले, ते कुळवाडी किंवा कुणबी. जे लोक आपले शेतकीचे काम संभाळून बागायती करू लागले, ते माळी. जे हे दोन्ही धंदे करून मेंढरे, बकरी यांचे कळप बाळगू लागले, ते धनगर. या तीन जातींचा सांप्रत आपसात बेटी व्यवहार होत नाही. बाकी अन्य सर्व काही होते. यावरून या तीन जाती पूर्वी एका शूद्र जातीच्या



असाव्यात. पुढे या तिन्ही जातींचे लोक आपला मूळचा शेतीचा धंदा निरूपायाने सोडून उदरनिर्वाहाकरिता नाना तऱ्हेचे धंदे करू लागले. पण बहुतेक अक्षरशून्य, देवभोळे व भुकेकंगाल आहेत.

''शिपाईगिरीच्या व शहाणपणाच्या जोरावर काहींनी जहागिरी व इनामे कमावली. ते शिंदे होळकरांसारखे प्रतिराजेच बनून गेले. परंतु हल्ली त्यांचे वंशज अज्ञानी, अक्षरशून्य असल्यामुळे आपापल्या जहागिरी व इनामे गहाण टाकून, कर्जबाजारी होऊन अन्नासही मोताद झाले आहेत. बहुतेक इनामदार जहागिरदारांना आपल्या पूर्वजांनी कसे केले, कसकशी संकटे भोगली, याची कल्पना नसल्यामुळे ते आयत्या पिठावर रेघा ओढतात. ते अशिक्षित असल्यामुळे दुष्ट व व्यसनी लोकांच्या संगतीत ऐषारामात गुंग होऊन कर्जबाजारी होतात. त्यांच्या आसपासचे लोक ब्राह्मण कारभारी इतके मतलबी, धूर्त, धोरणी असतात, की ते आमच्या राजे राजवाड्यांना विद्येची व सदभिरूचीची गोडी चाखू देत नाहीत. यामुळे आपल्या खऱ्या वैभवाचे स्वरूप न ओळखून आपल्या पूर्वजांनी केवळ आमच्या चैनीकरताच राज्यसंपादन केले असे मानून धर्माच्या योगाने अंध झालेले, राज्यकारभार स्वतंत्र रीतीने पाहण्याचे अंगी सामर्थ्य नसल्यामुळे केवळ देवावर भार टाकून, ब्राह्मण कारभाऱ्यांच्या ओंजळीने पाणी पिऊन, ते दिवसा गोप्रदाने व रात्री प्रजोत्पादन करीत स्वस्थ बसतात. राजेरजवाड्यांच्या हातून आपल्या शूद्र बांधवांचे कल्याण होण्याचा संभव विशेष. परंतु त्यांच्या मनात तो विचार कधीही आला नाही व जोपर्यंत 'ब्राह्मणो मम दैवतम्' हे वेड त्यांच्या डोक्यातून निघाले नाही, तोपर्यंत कितीही कपाळकूट केली तरी ती व्यर्थच ठरणार. इतके करून तसे करण्यास कोणी प्रवृत्त झाल्यास, बालपणापासून मनावर झालेल्या दृढ संस्कारांमुळे या मतलबी धर्माविरुद्ध चार गोष्टी ऐकून, त्यांचा विचार त्यास कोठून रुचणार ? व जवळचे कारभारी अगोदर अशा निःस्पृह व जात्याभिमान्यांची डाळच शिजू देणार नाहीत.''

'शेतकऱ्याचा आसूडा'च्या पहिल्या प्रकरणात ब्राह्मण शूद्रांना पाळण्यापासून स्मशानापर्यंत, गर्भाधानापासून तीर्थयात्रेपर्यंत धर्माच्या नावाखाली कसा छळतो व त्याने शूद्रांवर लादलेले धार्मिक संस्कार व विधी कसे अखंडपणे चालू असतात याविषयी साद्यंत माहिती दिली आहे. ज्या ब्राह्मणांना उच्च शिक्षण घेता येत नाही, ते संन्याशाचे सोंग घेऊन समाजातील अज्ञानी आणि अशिक्षित लोकांवर कसे वर्चस्व गाजवतात व त्यांची पिळवणूक करतात, हे दाखविले आहे.

''मुलांना शिक्षण देण्यासाठी शेतकऱ्याजवळ पैसा नसतो. मजा मारीत फिरणाऱ्या इंग्रज अधिकाऱ्यांना त्यांच्या गाऱ्हाण्याकडे लक्ष द्यावयास वेळ मिळत नाही. ते आपल्या हातांखालील ब्राह्मण नोकरांच्या सल्ल्यानुसार काम करतात. शेतकऱ्यांच्या संग्रही कुटुंबाला पुरेल इतके धान्य नसते. अंगावर वस्त्र नसते. इंग्रजांचे राज्य हे भरमसाठ पगार मिळवणाऱ्या अधिकाऱ्यांनी चालवलेले एक अत्यंत महागडे सरकार आहे.

सेवानिवृत्तीनंतर त्यांना देण्यात येणाऱ्या मोठमोठ्या वेतनांच्या अप्रत्यक्ष बोजाखाली शेतकरी साफ साफ चिरडून गेले आहेत,'' असे इंग्रज राज्याबाबत जोतीराव म्हणतात.

जोतीरावांच्या मते शेतकऱ्यांच्या आत्यंतिक दारिद्र्याची अनेक कारणे होती. ब्रिटिश राज्य येण्यापूर्वी राजे लोकांनी व संस्थानिकांनी पदरी मोठी सैन्ये ठेवली होती. त्यात मोठ्या संख्येने लोक नोकरी करीत. त्यामुळे शेतजमिनीवर मोठा भार पडत नसे. पेशव्यांचे राज्य लयास गेल्यावर मराठ्यांच्या सैन्यातील लोक घरी बसले. ब्रिटिशांचे राज्य आल्याने देशात शांतता प्रस्थापित झाली. त्यामुळे बेकारी प्रचंड प्रमाणावर वाढली. सैन्यातील लोक घरी आल्यामुळे शेतजमिनीवर त्यांचा भार पडला. शांततेच्या काळी लोकसंख्याही वाढली. कुटुंबातील वाटपामुळे शेतजमिनीचे लहान लहान तुकडे पडले. त्यांची गती थांबेना. तुकडे झालेल्या शेतजमिनीच्या उत्पन्नावर आपल्या कुटुंबाची आणि गुराढोरांची गुजराण करताना शेतकऱ्यांच्या नाकी नऊ येऊ लागले. जंगलखात्याने ग्रामीण भागातील कुरणे घशात घातली. त्यामुळे शेळ्या-मेंढ्यांना चरावयास जागा राहिली नाही. शेतकऱ्यांना आधारासाठी पडीक जमीन उरली नाही. जमीन धुपून गेली त्यामुळे तिचा सुपीकपणा कमी झाला. शेतजमिनीचे जे तुकडे पडले ते ज्या मोठ्या शेतकऱ्यांजवळ नांगर आणि बैल होते, त्यांना कसावयास वा विकत देण्यात आले आणि भूमिहीन झालेले शेतकरी कोष्ट्यांकडे, सुतारांकडे, लोहारांकडे, उदरनिर्वाहासाठी काम मिळावे म्हणून फिरू लागले.

परंतु लहानलहान धंदे करणारे कोष्टी, सुतार आणि लोहार यांच्याकडेही पूर्वीसारखे काम चालेना, कारण ब्रिटनमधून भारतात येणाऱ्या मालाशी ते स्पर्धा करू शकत नव्हते. चाकू, कात्र्या, सुऱ्या, शिवणकामाची यंत्रे, दोरा, कुलुपे, चाव्या, लोखंडी पत्रे, डांबर, भाते, निरनिराळ्या तऱ्हेच्या गाड्या व कपडा ही ब्रिटनमधून जकातीशिवाय हिंदुस्थानात आयात होत. त्याचा परिणाम असा झाला, की एतद्देशीय व्यापाऱ्यांचा धंदा अतिशय खालावला. कोष्टी, लोहार, सुतार यांना विपन्नावस्था प्राप्त झाली. आपल्याजवळील कच्चा माल ते सावकारांना विकू लागले व वाट फुटेल तिथे जाऊ लागले. ते लपून छपून दिवस काढू लागले. गव्हाच्या वा तांदुळाच्या कोंड्यावर व आंब्याच्या कोयांवर कशीबशी प्राणधारणा करून राहू लागले. रिकाम्या पोटात कावळे ओरडू लागले की ते ताडी व माडी पिऊन आपली भूक शमन करीत. त्यांचा आत्मा त्यांच्या स्वाधीन राहिला नाही आणि इंग्रज नोकरांचे जीवन पहावे तर ते निरनिराळ्या प्रकारची उत्कृष्ट दारू, पाव, बिस्किटे, गरम कपडे यांचा उपयोग घेऊन मजेत रहात. हिंदी शेतकरी मात्र दारिद्र्यात पिचत विव्हळत पडलेला असे.

'शेतकऱ्याचा आसूड' या ग्रंथात त्यांनी केवळ शेतकऱ्यांच्याच प्रश्नाची चर्चा केली नाही. त्यांच्या जीवनाच्या दुःखकारक परिस्थितीचाच केवळ आढावा घेतला नाही तर अनेक भारतीय समूहांचे निर्बंध तपासले व विकासाला पायबंद घालणाऱ्या निर्बंधांची चर्चा केली. परदेशात जाऊ नये; अशी जी बंधने आहेत त्याला जबाबदार ब्राह्मण आहेत असे या ग्रंथात विधान आहे. हिंदु संकुचित दृष्टीने झाले याच्या अनेक कारणांपैकी परदेशगमननिषेध हे एक होय. बाहेरच्या जगाचा संबंध तुटला व स्वतःला ते उच्च प्रतीचे मानू लागले. यात ब्राह्मणांचा हेतू सफल झाला. त्यांना शूद्र सेवा करावयास, शेतीवर राबण्यास व कपडे विणण्यास गुलाम म्हणून लाभले. तथापि जोतीरावांच्या काळातील ब्राह्मणांना ही घोडचूक आहे हे कळले आणि आपल्या चुका सुधारण्याचे सोंग करून ते म्हणू लागले की आपण आपल्या चालीरीतींची, रूढींची सुधारणा करू या. त्यावर जोतीराव म्हणतात, ते निव्वळ ढोंग होते.



जे ब्राह्मण शिक्षक खेड्यातील शाळांत शिक्षकाचे काम करीत, ते शिक्षकाची परीक्षा उत्तीर्ण झालेले नव्हते, ते अशिक्षित होते. ते शिकवण्याची कला कशी साधेल याची काळजी करण्यापेक्षा आपल्या सोवळ्या-ओवळ्याचीच जास्त काळजी घेत असत. ते स्वार्थी व ज्ञानशून्य होते. जर अब्राह्मण मुले शिकली व शासन यंत्रणेत घुसली, तर ब्राह्मणांना त्यांच्या दारी भीक मागावी लागेल, असे ते शेतकऱ्यांच्या मुलांना सांगत. ब्राह्मण इंग्रज अधिकाऱ्यांची खुशामत करीत. त्यांना मानपत्रे देत, त्यावर अज्ञानामुळे मूर्ख बनवलेले शूद्र सह्या करीत. या बहुमानाची परतफेड करण्यासाठी ब्राह्मणांना 'रावबहादूर' वा 'रावसाहेब' अशा पदव्या देत. यावरून जोतीरावांनी निष्कर्ष काढला, की या देशाला टोळधाड व दुष्काळ यांपासून वाचवणे शक्य होईल, पण ब्राह्मण नोकर जो कहर करत आहेत, त्यापासून कोणी वाचवू शकणार नाही.

जोतीरावांनी 'शेतकऱ्याचा आसूड' याच्या दुसऱ्या प्रकरणाच्या शेवटी म्हटले की, आपण सरकारी खात्यांतील ब्राह्मण नोकरांविरुद्ध जे आरोप केले, त्याची शहानिशा करायची असल्यास सरकारी न्यायालयाने दिलेले जे निर्णय प्रसिद्ध झाले आहेत त्यात किती ब्राह्मणांना शिक्षा झाली हे पहावे, म्हणजे खात्री पटेल. या ग्रंथाच्या तिसऱ्या प्रकरणात त्यांनी एक महत्वाचा विचार मांडला. त्यात त्यांनी प्रजासत्ताक राज्याचे महत्व गायले आहे. शूद्रांनी प्रजासत्ताक पद्धती तोडली म्हणून त्यांना पापाचे प्रायश्चित्त म्हणून गुलामगिरी प्राप्त झाली. ग्रीकांनी आपली प्रजासत्ताक राज्ये टिकवून धरली. हे त्यांनी शूद्रांच्या निदर्शनास आणून दिले. जोतीरावांनी स्पार्टातील वीरांची स्तुती केली. इराणी सैन्याची त्यांची उडविलेली दाणादाण याचे वर्णन ग्रंथात आहे. रोमनांनी ग्रीकांपासून स्फूर्ती घेऊन हनीबॉलचा पराभव केला. जूलियस सीझर याने लोकराज्य बळकावून आपल्या हाती सर्व सत्ता केंद्रित केली. यास्तव जोतीरावांनी सीझरचा धिक्कार केला. सीझर हा प्रजासत्ताक राज्याच्या ध्येयापासून च्युत झाला होता, खुशामत करणारे सरदार त्याचे दास बनले होते. पण ब्रूटसने सीझरला ठार मारून, अनियंत्रित कारभाराने लोकांवर जी संकटे कोसळतात त्यांपासून त्यांना वाचवले. यास्तव जोतीरावांनी ब्रूटसचे वर्णन 'महापवित्र स्वदेशाभिमानी' असे करून ब्रूटसचा गौरव केला आहे.

भारतातील परंपरागत समाजसंस्थांच्या विरुद्ध बंड करणारे पहिले पुरुष म्हणजे जोतीबा फुले होत. अशा बंडाची प्रेरणा त्यांना कुठून मिळाली ? भारतातील परंपरावादी समाज संस्थांची व या समाजसंस्थांच्या नियमधर्मांची पकड हजारो वर्षे येथील जनमानसात पक्की बसलेली होती. या ठिकाणी सामाजिक जन्मसिद्ध उच्चनीच भाव हे ईश्वरी संकेताने व माणसांच्या पूर्वकर्मांने निर्माण झालेले आहेत, म्हणून यांच्या विरुद्ध प्रयत्न करणे, हे महापाप आहे अशी समजूत होती. या महापापाची म्हणजे अपवित्रतेची भीती येथील जनमानसात कायम घर करून बसली होती. ही खोलपणे सहस्रावधी वर्षे रुजलेली भीती घालवणारी जबरदस्त प्रेरणा जोतिबा फुले यांना कुठून मिळाली ? जोतीबा फुले यांच्या महात्मतेचे रहस्य जाणण्याकरता या प्रश्नाचा उलगडा करणे, ही आज अत्यंत आवश्यक अशी गोष्ट आहे. जोतीबा फुले यांना जी भयंकर सामाजिक बंधने दिसली, ते तोडण्याचे जबरदस्त शिक्षण त्यांना कुठून प्राप्त झाले, यांचे उत्तर शोधणे म्हणजेच त्यांच्या महात्मतेच्या रहस्याचा शोध घेणे होय. नवीन ध्येयांचा प्रत्यय आल्याशिवाय, नवीन प्रकारच्या सामाजिक उद्दिष्टांचा अर्थ समजल्याशिवाय, परंपरागत सामाजिक संस्था नष्ट करण्याची प्रवृत्ती निर्माण होऊ शकत नाही. केवळ विनाशाकरता विनाश, म्हणून विनाशाकरिता प्रवृत्त होणे हे विध्वंसक अतएव विकृत मनोवृत्तीचे लक्षण आहे. जोतीबा फुले यांची मनोरचना अत्यंत निरामय होती, शाश्वत नैतिक सत्याच्या आधारावर त्यांची विचारसरणी अधिष्ठित होती. त्यांना उच्चतर सामाजिक विकासाला कारणीभूत होणाऱ्या चिरंतन मूल्यांचा प्रत्यय आला होता. जोतीबा हे 'सत्यशोधक' होते. हे सत्य मानवी जीवनाचे नैतिक सत्य होते. त्या चिरंतन सत्याचे स्वरूप म्हणजे विश्वमानवाच्या मुक्ततेचा सिद्धान्त. हा सिद्धान्त त्यांना आधुनिक पश्चिमी संस्कृतीने दिला व तो त्यांच्या काळी त्यांच्यासारख्या थोड्यांनाच घेता आला, इतरांना नाही.

## आठ

# सार्वजनिक सत्यधर्माचा आग्रह

सत्यशोधक जोतीबा यांनी अनेक पुस्तके व निबंध लिहिले. सत्यशोधक समाज स्थापून त्यांनी सामाजिक आंदोलनाचा प्रयत्न केला. या आंदोलनाच्या मुळाशी काही विधायक स्वरूपाच्या ध्येयाचा विचार होता. हा विचार म्हणजेच मूलभूत मानवी हक्कांचा विचार होय. समाजातील बहुसंख्य जनतेचे सामाजिक शोषण बंद करून सर्व मानवांना मुक्त करणारा विचार म्हणजेच मानवी हक्कांचा विचार होय. 'गुलामगिरी' व 'सार्वजनिक सत्यधर्म' दोन मूलभूत पुस्तके एकत्र वाचली म्हणजेच त्यांच्या वैचारिक मूल्यांची जाणीव होते. 'गुलामगिरी'मधील विचार हे मुख्यत: विध्वंसक होते. या विध्वंसक विचारातून उत्पन्न झालेल्या प्रश्नांचे उत्तर त्यांच्या विधायक विचारांत, म्हणजेच 'सार्वजनिक सत्यधर्म' या पुस्तकात मिळते. 'गुलामगिरी' हे पुस्तक वाचले म्हणजे सत्याचा अर्धा भाग मिळतो. अर्धसत्य हे नेहमीच धोकादायक असते. 'गुलामगिरी'तील संदेश आपणास भारतातील परंपरागत, ब्राह्मण-प्रधान, धार्मिक व सामाजिक संस्कृतीच्या विरुद्ध उठाव करण्यास प्रेरीत करतो. परंतु समोर असलेल्या परंपरागत समाजसंस्था नष्ट करून त्या जागी स्थानापन्न करावयाच्या सामाजिक संस्था ह्या ज्या तत्वांवर आधारलेल्या असल्या पाहिजेत, ती तत्वे त्यांनी 'सार्वजनिक सत्यधर्म' या पुस्तकात विशद करून सांगितली आहेत. ती तत्वे म्हणजे स्वातंत्र्य, समता आणि विश्वबंधुत्व ही होत. ही तत्वे गृहीत धरली म्हणजे जोतिबांना दिसलेल्या सत्यांचे पूर्ण स्वरूप दृष्टीसमोर येते.

'सार्वजनिक सत्यधर्म' या पुस्तकाचे योग्य व आवश्यक तितके मूल्यमापन केल्याशिवाय, जीवनातले जे सत्य शोधण्यासाठी जोतीबा जीवनसंग्राम चालवीत होते त्याचा खराखुरा अर्थ कळणे अशक्य आहे. हे पुस्तक जोतीरावांनी अर्धांगाचा झटका आल्यानंतर उजवा हात लुळा झाल्यावर, शरीरातील व्यथा सहन करीत, डाव्या हाताने लिहून पुरे केले आहे. 'गुलामगिरी'मध्ये जे सत्य दाखविले आहे ते अर्धसत्य आहे, त्याची दुसरी बाजू लक्षात घेतली नाही तर ते भयानक ठरेल, अशी त्यांची भूमिका होती. म्हणून शारीरिक व्यथा सहन करीत त्यांनी हे पुस्तक लिहून काढले. जोतीबांच्या विश्वकुटुंबवादाचा 'सार्वजनिक सत्यधर्म' हा जाहीरनामा आहे. भारतीय लोकशाही

क्रांतीची मूलभूत तत्त्वे विशद करून सांगणारा तो जाहीरनामा आहे. 'सार्वजनिक सत्यधर्म' मध्ये जोतीबांच्या महात्मतेचे तेजोवलय पूर्ण प्रकट झाले आहे. या तेजोवलयाचे तीन भाग आपल्या दृष्टीसमोर पडतात. ते म्हणजे मूलभूत मानवी हक्क, त्यांवर आधारलेला विश्वकुटुंबवाद आणि जीवनाचे व विश्वाचे सत्यस्वरूप प्रकट करणारा बुद्धिवाद हे होत. पश्चिमेकडून म्हणजे आधुनिक पाश्चिमात्य संस्कृतीकडून जोतीबांना या तीन प्रेरणा मिळाल्या. या तीन प्रेरणांतच त्यांची लोकशाही जीवनदृष्टी सिद्ध होते.

मूलभूत मानवी हक्कांच्या आधारावर विश्वकुटुंब कसे निर्माण होईल व त्याकरिता कशा प्रकारचा वर्तनक्रम व कशा प्रकारची वैचारिक भूमिका स्वीकारली पाहिजे यासंबंधी 'सार्वजनिक सत्यधर्मा'त तेहेतीस कलमी नियम मांडले आहेत. या कलमांचा सारांश शक्यतो जोतीबांच्या शब्दात असा :

''एकंदर सर्व गावांच्या, प्रांतांच्या, देशाच्या व खंडाच्यासंबंधाने अथवा कोणत्याही धर्मांतील मताच्या संबंधाने, स्त्री आणि पुरुष या उभयतांनी अथवा सर्व स्त्रियांनी अथवा पुरुषांनी, एकमेकांत एकमेकांची कोणत्याही प्रकारची आवडनिवड (भेदभाव) न करता या भूखंडावर आपले एक कुटुंब समजून एकमताने, एकजुटीने एकमेकांशी सत्य वर्तन करून रहावे.

''आपणा सर्वांच्या निर्माणकर्त्याने, एकंदर सर्व प्राण्यांना उत्पन्न करते वेळी, मनुष्यास जन्मतः स्वतंत्र प्राणी म्हणून निर्माण केले आहे आणि त्यांस आपापसांत सारख्या हक्कांचा उपभोग घेण्यास समर्थ केले आहे.

''आपणा सर्वांच्या निर्माणकर्त्याने, एकंदर सर्व स्त्रियांस अथवा पुरुषांस एकंदर सर्व मानवी हक्कांविषयी आपल्यास पाहिजे तशी मते बोलून दाखवण्यास, लिहिण्यास आणि प्रसिद्ध करण्यास स्वतंत्रता दिली आहे. परंतु त्या विचारांपासून व मतांपासून कोणत्याही प्रकारे नुकसान मात्र होऊ नये अशी खबरदारी ठेवावी. त्यास सत्य वर्तन म्हणतात.

''आपणा सर्वांच्या निर्माणकर्त्याने एकंदर सर्व स्त्री-पुरुषांस, एकंदर सर्व मानवी अधिकारांचे मुख्य धनी केले आहे. त्यातून एखादा मानव अथवा काही मानवांची टोळी, एखाद्या व्यक्तींवर जबर करू शकत नाही व त्याप्रमाणे जबर न करणाऱ्यास सत्य वर्तन करणारे म्हणतात.

''आपणा सर्वांच्या निर्माणकर्त्याने, सर्व मानव स्त्री-पुरुषांस धर्म व राजकीय स्वतंत्रता दिली आहे. जो आपल्यापासून दुसऱ्या एखाद्यास कोणत्याही तऱ्हेचे नुकसान देत नाही अथवा जो कोणी आपल्यावरून दुसऱ्या मानवाचे हक्क समजून इतरांस पीडा देता नाही, त्याला सत्यवर्तन करणारा म्हणतात.

''आपणा सर्वांच्या निर्माणकर्त्यास संतोष देण्यासाठी केलेले वर्तन याला सार्वजनिक सत्य म्हणतात. जो कोणी इतर मानव बंधूंबरोबर सत्य आचरण करील ती नीती म्हणावी. मग ती स्त्री असो पुरुष असो, तो कोणीही मानव असो, सत्यशोधक समाजसेवक असो अथवा एखादा गावडेकर असो.



''या पृथ्वीच्या पृष्ठभागावर जेवढी म्हणून मानवांनी पुस्तके लिहिली आहेत त्यापैकी काही ग्रंथात आरंभापासून शेवटपर्यंत सार्वजनिक सत्य होय, असे प्रत्येक धर्मपुस्तकात म्हटले आहे. पण काही व्यक्तींनी त्या वेळच्या प्रसंगास अनुसरून प्राण्यांना सारखे हितकारक न होता सहाजिकच माणसांमध्ये अनेक भेद निर्माण करून ठेवले. ते एकमेकांचे मनापासून हेवा व द्वेष करतात. प्रत्येक व्यक्तींस मानवी अधिकारांचा यथायोग्य उपभोग घेता यायलाच हवा.

''आपल्या या सूर्यमंडळासहित पृथ्वीचा निर्माणकर्ता जर एक आहे तर तिजवरील अनेक देशांतील लोकांनी एकमेकांशी वैरभाव माजवून प्रत्येकामध्ये देशाभिमान व धर्माभिमानाचे खूळ व्यर्थ का माजविले आहे ? त्याचप्रमाणे पृथ्वीवरील अनेक देशांतील सर्व नद्या या महासागरात मिळत असतात. त्यापैकी एका देशातील नदी तेवढी पवित्र कशी होऊ शकेल? या पृथ्वीच्या पृष्ठभागावर एकंदर सर्व मानवी प्राणी अवयवाने व बुद्धिकौशल्याने एकसारखे असून त्यापैकी काही लोक पिढीजात पवित्र बनतात, ते श्रेष्ठ कसे होऊ शकतील ? सर्वांना सारखे जन्म-मरण असून ते सर्वांप्रमाणे सद्गुणाने व दुर्गुणाने निपुण नाहीत का ? कोणत्याही प्रकारचा भेदभाव न करता एकंदर सर्व मानवांपैकी जे कोणी आपल्या कुटुंबाचे पोषण करताना जगाच्या कल्याणासाठी सतत कर्म करीत असतात, ते आर्य असो अथवा अमेरिकेतील असो, अथवा ज्याला तुम्ही नीच मानता, असा एखादा (चांडाळ) मृतप असो, ते अन्नदान घेण्यास पात्र आहेत. त्यालाच अन्नदान केल्याने निर्मिकाला आनंद होणार आहे.''

वरील विचार वाचले म्हणजे विचक्षण वाचकांच्या ध्यानात येते, की हे विचार भारतातील लोकशाही क्रांतीच्या अग्रदूताचे विचार होत. सर्व मानवांचे जे जीवन व्यक्तिस्वातंत्र्य आणि समता यांनी भरले आहे, ते सामाजिक जीवन हेच पृथ्वीवरील ईश्वराचे राज्य होय. अशा तऱ्हेचा निर्वाळा जोतीबा अनेक ठिकाणी देतात. पृथ्वीवरील ईश्वराचे राज्य ही कल्पना जोतीबांना ख्रिश्चन धर्मापासून मिळाली असावी असे स्पष्ट दिसते. आदर्श लोकशाही जीवनपद्धती आणि विश्वकुटुंब यांस पृथ्वीवरील ईश्वराचे राज्य असे जोतीबा म्हणतात. ख्रिश्चन धर्माच्या कल्पनेहून निराळे पृथ्वीवरील ईश्वराचे राज्य आदर्श म्हणून आपल्यापुढे ठेवले आहे. जोतीबा राष्ट्रवादी नव्हते. परंतु 'राष्ट्र' म्हणून संबोधन करताना त्यांच्या मताप्रमाणे ''स्वातंत्र्य आणि समता यांच्यावर आधारलेला प्रादेशिक समाज'' असा राष्ट्र याचा अर्थ होतो. जातीजातीत व धर्माधर्मांत निबद्ध झालेल्या समाजांची गाठोडी म्हणजे राष्ट्र नव्हे असे ते अनेक ठिकाणी सांगतात. त्यांच्या मताने कोणताही प्रादेशिक समाज हा विश्वसमाजाचा एक घटक म्हणूनच राहिला पाहिजे. मानवांना धर्मसंस्थांनी एकमेकांपासून विभक्त व एकमेकांचे शत्रू बनवून

खिंश्चन, मुसलमान इत्यादी भेद पाडले आहेत, हे भेद भयानक धर्मकल्पनांवर आधारलेले आहेत, असे ते वारंवार सांगतात. धर्मग्रंथ हे ईश्वरप्रणीत किंवा ईश्वरी प्रेरणेने निर्माण केले आहेत, असे म्हणणाऱ्या धर्मसंस्थांचा त्यांनी निषेध केला. धर्मात जे जे काही सांगितलेले असते ते सत्य होय, ही अंधश्रद्धा नाहीशी झाली पाहिजे, असाही ते वारंवार इशारा देतात. जगतात सर्व धर्म हे गैरसमजांवर व अंधश्रद्धेवर उभारले आहेत, यांच्यामध्ये जे जे काही सांगितले आहे ते सत्य आहे असे आपण म्हणता कामा नये, असे ते म्हणतात.

'निर्मिक म्हणजे ईश्वर.' जोतीबांनी विश्वनिर्माणकर्त्यास 'निर्मिक' हा नवीन शब्द वापरला आहे. याचे कारण जगातील सर्व ईश्वरवाचक जे जे प्रचलित शब्द आहेत, त्या शब्दांच्या पाठीमागे आराधना, भक्ती किंवा पूजा करण्याचे एक निरनिराळे कर्मकांड आहे. ते सर्व कर्मकांड व्यर्थ व मानवांच्यामध्ये सामाजिक फूट पाडणारे आहे असे त्यांचे मत आहे. म्हणून त्यांनी ईश्वर, अल्ला, गॉड, ब्रह्म इत्यादि ईश्वरवाचक रूढ शब्द काढून टाकले. मानवांची सेवा किंवा मानवी समतेचे व स्वातंत्र्याचे रक्षण ही खरी ईश्वराची पूजा होय असे ते म्हणतात.

जोतीरावांचा 'निर्मिक' एक मोठा विषय आहे. दहावे प्रकरण 'निर्मिक म्हणजे ईश्वर' या जोतीरावांच्या संकल्पनेला दिलेले आहे.

## नऊ

# शेवटची सात वर्षे

जोतीरावांच्या झेंड्याखाली ब्राह्मणेतर जनता मोठ्या संख्येने जमू लागली. सत्यशोधक समाजाचा एक महत्त्वाचा कार्यक्रम म्हणजे पुरोहितावाचून धार्मिक विधी, लग्नसंस्कार, घरभरणी इत्यादी कार्ये समारंभरूपाने करणे. बाळाजी कुसाजी पाटील नावाच्या गृहस्थाने आपल्या मुलाचे लग्न सत्यशोधक समाजाच्या नियमाप्रमाणे ब्राह्मणावाचून संस्कार करून केले. ब्राह्मण पुरोहिताच्या अनुपस्थितीमुळे विवाह यथाविधी झाला, असे म्हणता यावयाचे नाही, असे ब्राह्मण म्हणू लागले. पुणे जिल्ह्यातील ओतूर या खेडेगावात भोवतालच्या गावातील ब्राह्मणांची एक सभा भरली. 'ब्राह्मण पुरोहिताशिवाय लग्न लावणे हे ब्राह्मण पुरोहितांच्या हक्कावर आक्रमण होय,' असा ठराव त्यांनी केला. ओतूरच्या ग्रामपुरोहितांनी बाळाजी कुसाजी यांच्याविरुद्ध न्यायलयात खटला चालवला. ब्राह्मण पुरोहिताशिवाय लग्नसंस्कार करणे—विशेषत: ग्रामपुरोहिताशिवाय लग्न करणे—अयोग्य होय. ग्रामपुरोहिताला बोलवा, नका बोलवू, दक्षिणा मात्र पोचलीच पाहिजे असा निवाडा न्यायाधीश महादेव गोविंद रानडे यांनी केला. या निवाड्यामध्ये दोन महत्त्वाच्या गोष्टी न्याय्य ठरल्या. (1) संस्कार करण्याचा ब्राह्मण पुरोहिताला अधिकार आहे आणि (2) ग्रामपुरोहिताला बोलवा वा नका बोलवू, यजमानाने ग्रामपुरोहिताला दक्षिणा दिलीच पाहिजे.

हा महादेव रानडे यांचा निवाडा अखेर अमान्य झाला. बाळाजी पाटील यांच्या बाजूने जोतीराव उभे राहिले. खालच्या न्यायालयात विरुद्ध निकाल लागला तरी वरच्या न्यायालयात पाटलांच्या बाजूने निकाल लागला. या खटल्याची महाराष्ट्रभर चर्चा झाली.

जोतीरावांनी शेतकऱ्यांची एक नवीनच चळवळ उभारली. शेतकऱ्यांनी एक वर्षभर जमिनी तशाच पाडून ठेवल्या. शेवटी सरकारी अधिकारी, सावकार व जमीनदार यांनी शेतकऱ्यांचे पुढारी जोतीराव यांच्याशी तडजोड केली. जोतीरावांनी असे दाखवून दिले, की शेतकऱ्याचे दारिद्र्य हा सावकारांच्या लबाडीचा परिणाम आहे. सरकारने त्याकरता रिलीफ ॲक्ट केला. 'डेक्कन ॲग्रिकल्चरिस्ट रिलीफ ॲक्ट' असे त्याचे नाव होते. कमी व्याजात शेतकऱ्याला कर्ज मिळणे त्यामुळे शक्य झाले आणि मुख्यत: कर्जापायी जमिनीची मालकी गमावण्याची आपत्ती टळली.

देशी संस्थानांमध्ये आपल्या चळवळीचे लोण पोचावे अशी जोतीरावांनी अपेक्षा बाळगली. त्याकरिता तरुण, लोकहितदक्ष, नुकतेच गादीवर आलेले सयाजीराव गायकवाड यांच्याशी जोतीरावांनी 1884 मध्ये भेट घेतली. जोतीरावांची निःस्वार्थ बुद्धी आणि शुद्ध चारित्र्य या गुणांमुळे तरुण महाराजांच्या मनावर फारच चांगला परिणाम झाला. जोतीरावांनी बडोद्यात काही प्रमुख ठिकाणी व्याख्याने दिली. सयाजीराव महाराजांच्या समोर काही ठिकाणी व्याख्याने दिली. बडोद्याला ते अनेक वेळा गेले. दुसऱ्या भेटीत 'शेतकऱ्याचा आसूड' या ग्रंथाची प्रकरणे महाराजांना वाचून दाखविली. महाराजांवर या व्याख्यानांचा परिणाम झालाच. त्यांनी ब्राह्मणांना खिचडी देण्याची संस्थानाची प्रथा या व्याख्यानानंतर बंद पाडली.

सत्यशोधक समाजाच्या नेत्यांनी एप्रिल 1885 मध्ये पुणे येथे गुढीपाडव्याच्या दिवशी एक मोठी मिरवणूक काढली. कार्यकर्त्यांचा आणि वजनदार व्यक्तींचा मोठा समुदाय या मिरवणुकीत जमला होता. हिरव्या-पिवळ्या रंगांचे ध्वज या मिरवणुकीत फडफडत होते. मिरवणुकीच्या अग्रभागी बँड लावला होता. मागाहून महार वाद्ये वाजवीत व गीते गात चालले होते. महारांच्या मागून ताशे वाजंत्री वाजत होती. त्यांच्या मागून ढोल व तुतारी वाजवणाऱ्यांचा ताफा चालला ओता. मिरवणुकीमध्ये लोकांचा मोठा समुदाय आणि समाजात मानमान्यता असलेल्या प्रतिष्ठित व्यक्ती दिसत होत्या. स्वतः जोतीराव, रामय्या व्यंकय्या अय्यावारू, महादेव गोविंद रानडे, कृष्णराव भालेकर, डॉ. सदोबा गावडे, एल्. के घोरपडे, देवराव ठोसर, एच्. एल्. नवलकर प्रभृती व्यक्ती सामील झाल्यामुळे या मिरवणुकीला मोठी प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. भवानी पेठेतील विठोबाच्या देवळापासून सायंकाळी चार वाजता निघालेली ही मिरवणूक डॉ. सदोबा गावडे यांच्या घराजवळ रात्री नऊ वाजता पोचली. लगेच जोतीराव, रानडे, अय्यावारू इत्यादींची भाषणे झाली.

मराठी साहित्यिकांची दुसरी वार्षिक परिषद 24 मे, 1885 रोजी पुण्यातील सार्वजनिक हॉलमध्ये कृष्णशास्त्री राजवाडे यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. सुमारे तीनशे साहित्यिक उपस्थित होते. उपस्थित राहू न शकणाऱ्यांची पत्रे वाचण्यात आली. अशी त्रेचाळीस पत्रे होती. त्यात जोतीरावांचे पत्र प्रथम वाचण्यात आले. जोतीरावांचे पत्र त्यांच्या आयुष्यातील ध्येयवादाची थोडक्यात, खणखणीत शब्दांत मांडणी करणारे आहे. गरीब, बहुसंख्य जनतेच्या प्रश्नांना तोपर्यंत मराठी साहित्यात महत्त्वाचे स्थान क्वचितच दिले जात होते.

1885 सालच्या पावसाळ्यात सयाजी महाराज गायकवाड पुण्यात दोन महिने राहिले होते. जोतीरावांनी महाराजांच्या सन्मानार्थ एक मोठा समारंभ घडविला. या समारंभात महादेव गोविंद रानडे, डॉ. भांडारकर, जोतीराव फुले यांची भाषणे झाली. महादेव गोविंद रानडे यांचे एक महत्त्वाचे भाषण झाले. ज्ञानप्रकाश पत्रामध्ये रानडे यांच्या भाषणाची प्रशंसा करण्यात आली व जोतीरावांच्या भाषणाबद्दल नाखुषी व्यक्त करण्यात आली. ज्ञानप्रकाशातील टीकेला उत्तर म्हणून जोतीरावांनी 1885 जून महिन्यात 'इशारा'नावाची पुस्तिका लिहिली. त्यात रानड्यांच्या विचारांचे खंडन मुख्यतः आहे. आहे. त्यातील अनेक मुद्दे सद्यस्थितीत लागू नसले, तरी तत्कालीन परिस्थितीचा अर्थ समजण्यास उपयुक्त ठरतील. त्यात इंग्रज सरकारच्या अमलाचे स्वागत केले आहे.



'इशारा' या पुस्तिकेत दुसऱ्या बाजीरावाच्या राज्यात शेतकऱ्यांचे जे अनन्वित हाल झाले, त्याचे हृदयद्रावक वर्णन केले आहे. त्याचे राज्य परमेश्वराने हरण करून शूद्रादी-अतिशूद्र प्रजेस परमन्यायी हितावह, सौख्यकारक, सदाचारी आणि शांत असे राज्य इंग्रज सरकारच्या अंमलाखाली प्राप्त करून दिले. सबब ती प्रजा ईश्वरास रात्रंदिवस अशी प्रार्थना करीत आहे, की हे प्रभो, हे राज्य चिरकाल असू देत; कारण हे राज्य झाल्यामुळे पूर्वीच्या राज्यात भटशाहीमध्ये जुलूम होत असत, त्या सर्वांतून प्रजा सुटली.

ह्या पुस्तिकेत जोतीरावांनी एका ब्राह्मण सावकाराची गोष्ट दिली आहे. ती वाचून अंगावर शहारे येतात. ब्राह्मण सावकार, मारवाडी आणि दुसरे सावकार शेतकऱ्यांची जमीन कशी लुबाडीत, गोड बोलून खोटे दस्तऐवज बनवून त्यांना कसे भिकेस लावीत, यांचे हृदयद्रावक वर्णन केले आहे.

जोतीरावांनी 'सत्सार' नावाची एक पुस्तिका जून 1885 मध्ये प्रसिद्ध केली. या पुस्तिकेमध्ये संवाद आहेत. पहिल्या प्रकरणात पंडिता रमाबाईच्या धर्मांतरासंबंधी उल्लेख आहे. रमाबाईविषयी आदरपूर्वक चर्चा आहे. ब्राह्मण संख्येने लहान असताना त्यांच्या दसपट संख्येने असणाऱ्या ब्राह्मणेतरांवर त्यांनी प्रभुत्व आणि सत्ता कशी गाजवली ? असा प्रश्न उपस्थित करून त्याचे उत्तर जोतीरावांनी प्रतिप्रश्न विचारून दिले. मूठभर महंमदी व इंग्रज कोट्यवधी हिंदूंचे भूपती कसे झाले ? तसेच हे घडले. ब्राह्मण धर्माने देवांस फसविले व शूद्रांवर गुलामगिरी लादली.

या पुस्तिकेच्या दोन हजार अंकांपैकी जोतीरावांच्या मित्रांनी 1050 प्रती विकत घेऊन निरनिराळ्या गावी वाटल्या. या पुस्तिकेच्या शेवटच्या भागात जोतीराव आणि एक ब्राह्मण यांतील एक संवाद दिला आहे. ब्राह्मणांशी ते नेहमी काहीसे कडवटपणे व खरमरीत सुरात बोलत असत. तरी जोतीरावांचे जिवश्चकंठश्च मित्र ब्राह्मण जातीतले होते.

जोतीरावांनी सत्सारचा दुसरा अंक ऑक्टोबर 1885 मध्ये प्रसिद्ध केला. इंग्रजी राज्यात स्त्रियांचा सर्वतोपरी छळ झाला व होत आहे ही सर्व पुरुषांची ठकबाजी स्त्रियांच्या डोळ्यांपुढे मांडावी म्हणून या अंकात थोडासा प्रयत्न केला आहे. हिंदू धर्मशास्त्रात स्त्रियांविषयी जे अन्यायी, जुलमी व पक्षपाती धोरण आखले, त्याविषयी जोतीरावांनी त्यांच्यावर कडाडून हल्ला केला. स्त्रियांच्या दुःखाला वाचा फोडली. स्त्री-शिक्षणाचा व

त्यांच्या उद्धाराचा इतिहास लिहिणाऱ्या प्रामाणिक इतिहासकारांनी नोंद घ्यावी, इतका तो चांगला आहे. दोन अंकांनंतर सत्सारचा अंक निघाला नाही. त्यानंतर 'अस्पृश्यांची कैफियत' नावाची एक पुस्तिका त्यांनी लिहिली.कल्पना केली आहे, की एक महार आणि एक मांग हे भारताच्या दौऱ्यावर निघालेल्या महाराणी व्हिक्टोरियाला आपल्या वस्तीत येण्याचा आग्रह करीत आहेत. ते म्हणतात की तुमच्या राज्यात आमची काही सुधारणा झाली आहे का, ते पहा. महाराणी त्यांच्या वस्तीला भेट देते. तिला ते म्हणतात, की पेशव्यांच्या राज्यात अस्पृश्यांना फार निर्दयतेने वागवीत असत, त्यांना कुत्र्यामांजराचे जीवन जगावे लागे, त्या काळी त्यांना इमारतीच्या पायाखालीसुद्धा जिवंत गाडीत असत. जबरदस्तीने वेठीस धरीत असत. ब्रिटिश राजवटीत त्यांचे जीवन सुरक्षित झाले. परंतु रस्त्यातून त्यांना अजून मोकळेपणाने चालता येत नाही. बाजारात ते मोकळेपणाने फिरू शकत नाहीत. दारिद्र्यामुळे ते आपली मुले शाळेत पाठवू शकत नाहीत. महाराणीने असे आश्वासन दिले, की तुमच्या गाऱ्हाण्यांची चौकशी माझे सरकार करील.

अस्पृश्यांचे प्रश्न सोडवण्याच्या दृष्टीने जोतीरावांनी एक महत्त्वाची कामगिरी केली. त्यांनी प्रत्यक्ष अस्पृश्य समाजातच कार्यकर्ते निर्माण केले. अस्पृश्य वस्त्यांना ते नेहमी भेट देत आणि त्यातील उत्साही व बुद्धिमान तरुणांनी अस्पृश्यांच्या कल्याणासाठी झटावे म्हणून उत्तेजन देत. त्यांना लिहायला व भाषणे करायला शिकवीत. समाजकार्य कसे करावे याचे मार्गदर्शन करीत.

अशा कार्यकर्त्यांपैकी गोपाळबाबा वलंगकर हे आद्य व प्रमुख होते. ते जोतीरावांचे विद्यार्थी. शिकवणीने व मार्गदर्शनाने ते लेखक झाले, पट्टीचे प्रचारक झाले; उत्तम वक्ते बनले. लष्करातील पायदळ विभागात त्यांची नोकरी होती. ती कालांतराने सोडली. अस्पृश्यता निवारणाच्या कार्याला त्यांनी वाहून घेतले. दीनबंधू आणि सुधारक या साप्ताहिकांमध्ये त्यांनी बरेच जळजळीत लेख लिहिले. गावोगावी फिरून महारमांगांमध्ये व्याख्याने देऊन जागृती निर्माण केली. अस्पृश्यता ही मानवनिर्मित आहे; देवनिर्मित नाही, असा विचार वलंगकर चांगला विस्तृत युक्तिवादावर आधारून जनतेला पटवून देत. वलंगकरांनी या संदर्भात 1888 मध्ये एक पुस्तिका लिहिली. त्यात अस्पृश्यता देवनिर्मित कशी आहे हे सिद्ध करा, असे सनातनी जातिभेदांवर श्रद्धा असलेल्या हिंदूंना आव्हान दिले. त्यांनी अनेक संस्था स्थापल्या. 1895 च्या 'सामाजिक परिषदेमध्ये' स्फूर्तिदायक भाषण केले.

जोतीरावांनी अनेक गद्यग्रंथ लिहिले. त्याबरोबरच ठसकेदार, खडबडून जागे करणाऱ्या मराठी शैलीत अभंग लिहिले. स्वतःच्या अभंगाला त्यांनी 'अखंड' अशी संज्ञा दिली. जोतीरावांनी सत्यशोधक समाजाच्या सभासदांकडे होणाऱ्या विवाहाच्या वेळी, सुरेल आवाजात म्हणता येतील अशी मंगलाष्टके रचली. ती 'सार्वजनिक सत्यधर्म' पुस्तकात दिली आहेत. या मंगलाष्टकांचे वैशिष्ट्य असे, की वधू आणि वर यांनी आळीपाळीने स्वतः मंगलाष्टके म्हणायची आणि उपस्थित पाहुणे मंडळींना त्या नूतन वधुवरांस एका पद्यात आशीर्वाद द्यावयाचा.



सत्यशोधक समाज आणि प्रार्थनासमाज या दोन्ही संस्था धर्मसुधारकांनी स्थापलेल्या, परंतु त्यांच्यामध्ये एकमेकांबद्दल सहानुभूतीची भावना नव्हती. कनिष्ठ वर्गाच्या उद्धाराचे कार्य हा सत्यशोधक समाजाचा विचारविषयक होय. प्रार्थना समाजाच्या मंडळीचे धर्मसुधारणेचे व समाजसुधारणेचे विचार एक महत्त्वाची चळवळ निर्माण करू शकतील, अशा रीतीने मांडले जात नव्हते. सत्यशोधक समाज ब्राह्मणांविरुद्ध प्रखर लेखन आपल्या 'दीनबंधू' सारख्या नियकालिकात चालवीत असे. जोतीरावांचे अनेक भागीदार होते. ते हळूहळू या ना त्या कारणास्तव त्यांच्यापासून वेगळे झाले हे या पुस्तकात पहिल्या प्रकरणात सांगितलेच आहे. 'पूना कमर्शिअल अँड काँट्रॅक्टिंग' कंपनी जोतीरावांनी सुरू केली. मुंबईच्या बाजारात पुण्याहून भाजी पाठवण्याचे काम ही कंपनी करीत असे. जोतीरावांना हा धंदा फायदेशीर ठरला नाही.

पुणे नगरपालिकेच्या कामकाजात जोतीराव अत्यंत उत्साहाने भाग घेत असत. शहरातील कचरा गोळा करून एकत्र कोठे टाकायचा यासंबंधी जागा ठरविण्याकरिता नगरपालिकेने 1879 मध्ये जोतीरावांची निवड केली. त्या काळी पुणे शहर एका मोठ्या वादळात सापडले होते. वासुदेव बळवंत फडक्यांच्या बंडाने पुण्यासह सर्व महाराष्ट्र गदगदा हादरून सोडला. या विषयी पूर्वी आम्ही लिहिले आहेच. पण येथेही पुन्हा लिहीत आहोत ते जोतिरावांच्या एका स्वभावपैलूचे दर्शन देण्यासाठी. फडक्यांच्या बंडानंतर दहा वर्षांनी जोतीरावांनी 'सार्वजनिक सत्यधर्म' हे पुस्तक लिहिले. त्यात फडक्यांचा उल्लेख अनादराने केला आहे. विष्णूशास्त्री चिपळूणकर यांनी फडक्यांना 'यःकश्चित दरोडेखोर' म्हणून तिरस्काराने निर्दिष्ट केले. महादेव रानड्यांनी 'माथेफिरू देशभक्त' म्हटले. वासुदेव बळवंत आणि जोतीराव यांचा चांगला परिचय होता. दोघांनीही लहुजीबुवा मांग यांच्याकडे शस्त्राचे शिक्षण घेतले होते. फडके या सहाध्यायाला जोतीरावांनी तात्त्विक विरोध असतानाही बंडात गुप्तपणे थोडी मदत केली ! कोणी म्हणतील याला पुरावा नाही. पण जोतीरावांच्या माणुसकीशी मात्र हे आम्ही सुसंगत मानतो.

ब्रिटिश सरकारने 1870 सालच्या शिक्षणविषयक कायद्याप्रमाणे इंग्लंडमध्ये सार्वत्रिक प्राथमिक शिक्षण देणाऱ्या शाळा निर्माण करण्यास सुरवात केली. त्याचा प्रतिध्वनी भारतात जोतीरावांनी उमटविला. शेतकऱ्यांबद्दल कळवळा असणारे जोतीराव नवीन सुधारणा शेतकरी लवकर मान्य करीत नाहीत हे जाणून होते. अज्ञान आणि भोळेपणा यांच्यामुळे प्रत्यक्ष उदाहरण दाखवल्याशिवाय शेतकरी नवीन कार्यक्रम स्वीकारत नाहीत, हे जोतीरावांना माहीत होते. म्हणून 200 एकर जमीन खरेदी करून नवीन पद्धतीची शेती करण्यास जोतीरावांनी प्रारंभ केला. कालव्याचे पाणीही घेण्यास शेतकरी उत्सुक

नसत. जोतीरावांनी कालव्याचे पाणी घेतले व पुण्याजवळील मांजरी जंगलात त्यांनी आंबराई तयार केली.

कामगारांची संघटना करून कामगारांना आत्मउद्धार करण्याचा कार्यक्रम आणि विचार देण्यास, सत्यशोधक समाजाच्या नेतृत्वाखाली व जोतीरावांच्या मार्गदर्शनाखाली आरंभ झाला. मुंबईत गिरण्यांचा धंदा सुरू करावा ही कल्पना 1850 साली डॉ. भाऊ दाजी लाड यांनी प्रथम मांडली. गिरण्यांचा धंदा सुरू झाला, वाढला. नारायणराव लोखंडे आणि रामजी संतूजी आवटे यांनी कृष्णराव भालेकर यांना संपादक करून पुणे येथे प्रकाशित करण्यास सुरवात केलेला 'दीनबंधू' मुंबईत प्रसिद्ध होऊ लागला. दामोदर सावळाराम यंदे या बहुश्रुत, तडफदार, मधूरभाषी, लोकसंग्रही आणि योजनाकुशल व्यक्तीकडे दीनबंधूचे प्रमुख संपादकत्व आले.

1875 च्या मार्चमध्ये गिरणी कामगारांच्या परिस्थितीचा विचार करण्यासाठी सरकारने मंडळ नेमले. त्यांचे सर्व समासद गिरणीमालकच होते. तरुण मुले आणि स्त्रिया यांना दिवसभर गिरण्यांमध्ये कष्ट करावे लागत. त्यावेळी मुंबईत 41 गिरण्या निघाल्या. नारायणराव लोखंडे दीनबंधूमधून कामगारांच्या गाऱ्हाण्यांना वाचा फोडण्याचे कार्य करू लागले. पण दृष्टिकोन तडजोडीवादी ठेवावा लागे. त्यामुळे गिरणीमालक कामगार संघटनेच्या विरोधी नव्हते. परंतु कामगारांना अपरंपार कष्ट पडत. बहुतेकांना 14 तास काम करावे लागे. मोकळी हवाच मिळत नसे. लहान मुलांनाही गिरण्यांमध्ये शक्ती पिळून टाकणारी कामे करावी लागत.

कामगारांचा प्रश्न हा गरीब जनतेचा प्रश्न असल्यामुळे दीनबंधू नियतकालिक कामगारांचे प्रश्न परखडपणे मांडत असे. हे एकच पत्र कामगारांची बाजू मांडणारे होते. कामगारांच्या उद्धारार्थ वाहिलेले सत्यशोधकांचे मुखपत्र दीनबंधू हेच होते. जोतीराव आणि लोखंडे मुंबईत कामगारांच्या सभांतून भाषणे करीत. नारायणराव लोखंडे हे हिंदुस्थानातील कामगार संघटनेचे आद्य जनक म्हणून मानले जातात, याचे कारण 1880 साली त्यांनी आपली 'मिल-हॅण्ड असोशिएशन सोसायटी' स्थापन केली. त्याच सुमाराला सरकारने 'फॅक्टरी-कमिशन' नावाचे एक मंडळ कामगारांची परिस्थिती पाहण्याकरिता नेमले. त्यावेळी लोखंडे यांनी 'फॅक्टरी-कमिशन' वर कामगारांचा प्रतिनिधी निवडण्यासाठी परिषद बोलावली. त्या परिषदेने लोखंड्यांनाच प्रतिनिधी म्हणून निवडले. 25 जुलै 1880 रोजी भारतातील स्वदेशीचे आद्य पुरस्कर्ते पुण्यातील गणेश वासुदेव जोशी तथा सार्वजनिक काका निधन पावले. लोकहितवादी गोपाळराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली सार्वजनिक काकांना श्रद्धांजली वाहणारी शोकसभा पुण्यात भरवण्यात आली. त्या सभेत जोतीरावांनी भावनाप्रधान भाषण केले. पुणे नगरपालिकेची जनहितदक्ष हालचाल जोतीराव फुल्यांमुळे अधिक तत्परतेने होऊ लागली. नगरपालिकेत काम करताना गरीब शेतकरी-दुकानदाराला स्वस्त भाड्यात



दुकान चालविण्याकरता जागा प्राप्त व्हावी याबद्दल जोतीरावांची खटपट असे.

जोतीराव 1885 सालच्या सप्टेंबरात मुंबईस गेले होते, त्या वेळी कामगार वस्तीत निरनिराळ्या ठिकाणी त्यांनी व्याख्याने दिली, त्यांच्या व्याख्यानाचा विषय 'सामाजिक तत्त्वज्ञान' हा होता. जोतीराव ठाणे येथे सत्यशोधक समाजाच्या वार्षिक उत्सवालाही गेले. सत्यशोधक समाजाचे अनुयायी, कार्यकर्ते आणि नेते आपल्या नेत्याला मानाचा मुजरा करण्यासाठी तेथे प्रचंड संख्येने जमा झाले. त्यांचा उत्साह अमर्याद होता. या वार्षिक समारंभामध्ये असे ठरले, की 'सत्यशोधक निबंधमाला' नावाची पुस्तकमाला नारायणराव लोखंडे यांनी प्रसिद्ध करावी. त्याप्रमाणे लोखंडे यांनी निबंधमाला प्रसिद्ध करून, त्यात ब्राह्मणशाहीवर मोठा हल्ला केला.

इंग्रज राजवटीच्या विरुद्ध काही महत्त्वाचे प्रश्न जोतीरावांनी उपस्थित केले. 1885 साली 'इंडियन नॅशनल काँग्रेस'ची स्थापना झाली. ती सामान्य गरीब बहुजन समाजाची दुखणी लक्षात घेईल, असा विश्वास जोतीरावांमध्ये नव्हता. काही काळाने लोकमान्य टिळक आणि महात्मा गांधी यांनी इंडियन नॅशनल काँग्रेसचे नेतृत्व स्वीकारून सर्वसाधारण जनतेत जागृती केली. जोतीराव आपले टीकात्मक लेख दीनबंधू पत्रात प्रसिद्ध करीत असत. जोतीरावांचे सार्वजनिक कार्य आणि ग्रंथ यांच्याकडे मामा परमानंद या मुंबईतील नेत्याचे लक्ष वेधले गेले. मामा परमानंद हे रानडे, तेलंग आणि भांडारकर यांनाही वैचारिक सल्ला देत असत. मामा परमानंद यांना जोतीरावांकडून मराठीतील पोवाडे वाङ्मयावरील रचना माहीत करून घेण्याची इच्छा झाली. जोतीरावांनी शिवाजीवर पोवाडा लिहिला होता. परंतु मराठीतील शिवाजीवरील प्रसिद्ध झालेले इतरांचे पोवाडे ब्राह्मणांना अकारण महत्त्व देत आहेत, असे जोतीरावांना वाटत होते. संत रामदासांचा मोठेपणा त्यांना मान्य नव्हता.

1885 साली पुण्यात नवीन मार्केट इमारत बांधून पूर्ण झाली. त्या वेळचे मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड रे यांचे नाव त्या इमारतीस देण्यात आले. व्यापारी मात्र त्यातील दुकाने भाड्याने घेईनात; कारण भाडे न परवडणारे होते. परंतु इमारत बांधण्याकरिता लाखो रुपये खर्च झाला. तो लक्षात घेऊन भाडे ठेवण्यात आले. असे महागडे मार्केट बांधण्यास जोतीरावांचा विरोध होता. या मंडईच्या इमारतीला मुंबईच्या गव्हर्नरांचे नाव दिले, तरी जोतीरावांचा विरोध चालूच राहिला. योगायोग असा, की या 'रे मार्केट'ला अलीकडे 'फुले मार्केट' हे नाव पडले आहे.

सत्यशोधक समाजाच्या ब्राह्मणविरोधी कार्यक्रमांप्रमाणे ब्राह्मणांवाचून लग्ने लावण्याची चळवळ सुरू झाली. जुन्नर तालुक्यातील तळवणे गावी गुणाजी बापूजी पाटील यांनी ब्राह्मण भटावाचून आपल्या घरचे लग्न केले. त्यामुळे ब्राह्मणाला दक्षिणा, कपडे, इतर देणग्या आणि मेजवानी देण्यात जो पैसा खर्च व्हायचा, तो वाचत असे. जून 1887 मध्ये या चळवळीचा वेगाने विस्तार होऊ लागला. जोतीराव व त्यांचे

अनुयायी यांनी ब्राह्मणांवाचूनचे लग्न-समारंभ निर्धाराने पार पाडण्याचा सपाटा चालविला. एका न्हाव्याचे लग्न अशाच पद्धतीने पार पाडण्यात आले. न्हावी आणि ब्राह्मण यांच्यामध्ये तेढ उत्पन्न झाली. ब्राह्मणांनी न्हाव्यांवर बहिष्कार टाकला व ब्राह्मणांनी एकमेकांच्या हजामती सुरू केल्या अशी हूल उठली. हा लढा दूरवर पसरला. ब्राह्मणांनी वेद टाकून वस्तरा हाती घेतला, अशी टीका सुरू झाली. वेदशाळेबरोबरच हजामतीचे तंत्र शिकविणाऱ्या शाळा ब्राह्मणांनी काढाव्या व ही नवीन विद्या शिकून घ्यावी, अशा तऱ्हेची टीका सुरू झाली.

जोतीरावांनी 10 जुलै 1887 रोजी आपले इच्छापत्र (मृत्युपत्र) केले. त्यात त्यांनी म्हटले आहे की, ''मी निपुत्रिक असल्यामुळे एका विधवेचा यशवंत नावाचा मुलगा आम्ही पतीपत्नींनी मुलगा म्हणून स्वीकारला आहे. त्याच्या आईचे नाव काशी. आमच्या पश्चात स्थावर जंगम व इतर प्रकारची मालमिळकत याचा यशवंत मालक म्हणून राहील. आमच्या इतर कोणत्याही भाऊबंदांचा या मिळकतीवर मालकी हक्क नाही. यशवंत आज तेरा वर्षांचा आहे. तो वयात आल्यावर शूद्रातिशूद्र बांधवांचे आर्यभट ब्राह्मणांच्या कचाट्यापासून सुटका करण्याच्या चळवळीमध्ये आपले आयुष्य आणि आपले सर्वस्व खर्च करून जन्माचे सार्थक करील. आमचा अंत्यविधी करण्याचा यशवंतास मात्र अधिकार आहे. आम्हा उभयतांच्या शवास वडिलोपार्जित रिवाजाप्रमाणे मिठात घालून पुरावे. माझ्या शवावर आर्यभट ब्राह्मणजातीसह त्यांच्या अनुयायांचीसुद्धा सावली पडू देऊ नये.''

जोतीरावांना सर्व लोक 'तात्यासाहेब' म्हणून संबोधित. त्यांची देहयष्टी बळकट आणि आकर्षक होती. त्यांचा वचक लगेच बसत असे. अनेक लोक त्यांना प्रक्षोभक प्रश्न विचारीत. त्यांची उत्तरे ते शांतपणे देत. आपल्या अनुयायांनी विरोधी माणसांवर हात उगारू नये म्हणून ते आपल्या अनुयायांना शांत राहण्याची आज्ञा करीत. अस्पृश्यांच्या वस्तीत ते फेरी मारत. आईबाप कामावर गेलेल्या शेंबड्या मुलांना त्यांचे तोंड पुसून ते कुरवाळत. कित्येक वेळा खाऊ विकत घेऊन देत. घाणेरड्या शेंबड्या मुलांना ते जवळ बसवीत. जोतीरावांच्या ओळखीची मंडळी त्यांना याबाबतीत खोचून विचारत, तेव्हा गरिबीमुळे गलिच्छ कपडे आणि राहणी असते, आपले मन स्वच्छ धुतले पाहिजे; म्हणजे सहानुभूती आणि करुणा या आपल्याला गरीबांच्या जगात राहण्यास प्रवृत्त करील, असे उत्तर मिळे. एका फाटके कपडे घातलेल्या भिकाऱ्याला जोतीरावांनी आपल्या खांद्यावरील उपरणेच एकदा देऊन टाकले. जोतीराव ज्ञानदेवादिक संतांना मानीत नव्हते. तरी आळंदीला जात असत. कोणी हटकले तर, आळंदीला सुद्धा देव आहेत, असे उत्तर देत. आळंदीच्या यात्रेत यात्रेकरूंच्या घोळक्यात एक म्हातारा घेरी येऊन पडला. त्यांनी त्याला जवळ घेऊन शुद्धीवर आणले; पाणी पाजले व भाकरी दिली.

जोतीरावांचे सहकारी नारायणराव लोखंडे आणि कृष्णराव भालेकर मतभेदांमुळे दूर



झाले हे मागे सांगितलेले आहे. जोतीरावांचा स्वभाव कडक होता. त्यांच्या करड्या वागणुकीमुळे अनेक मित्रांची मने दुखावली जात. जोतीराव अति कठोर भाषेत हल्ला करीत. व्याख्यानांमधून टीकेची आग ओतीत. त्यांच्याच मताचे, सत्यशोधक समाजाविषयी सहानुभूती बाळगणारे राजारामशास्त्र्यांसारखे जोतीरावांना संयमाची भाषा बोलण्याची वारंवार सूचना देत. ब्राह्मण जातीचा धिक्कार करणे आणि जाती-जातींमध्ये फूट पाडणे योग्य नाही, असे राजारामशास्त्र्यांसारखे समाजसुधारक त्यांना सांगत असत.

सन 1888 हे वर्ष संकटाचे ठरले. चाळीस वर्षे समाजसुधारणेची आणि धर्मसुधारणेची चळवळ अखंडपणे चालविली. त्यांचा त्यांच्या प्रकृतीवर फारच ताण पडला. याचवेळीच जोतीरावांच्या अनुयायांनी त्यांच्याविषयी कृतज्ञता दाखवून त्यांचा सत्कार करण्याचे ठरविले. जोतीरावांची वयाची साठ वर्षे पूर्ण झाली होती. त्यांचा जाहीर सत्कार करण्याचे सत्यशोधक चळवळीतील कार्यकर्त्यांनी ठरविले. गावोगावच्या कार्यकर्त्यांना आमंत्रणे पाठविली. 11 मे 1888 या दिवशी सत्कार झाला. सयाजीराव महाराज यांनाही आमंत्रण देण्यात आले. जोतीरावांना 'हिंदुस्थानचे बुकर टी वॉशिंग्टन' अशी पदवी द्यावी, असा निरोप दामोदर सावळाराम यंदे यांच्याकरवी सयाजीरावांनी पाठविला होता. मांडवी येथील कोळीवाज सभागृहामध्ये 11 मे 1888 रोजी दुपारी भव्य समारंभ पार पडला. सभागृहात सामान्य जनतेची गर्दी उसळली. सभागृहात आणि बाहेरही लोक जमा झाले. सर्व नेत्यांनी भावनेने भरलेली भाषणे केली. दलित समाजाची चाळीस वर्षे दीर्घकाळ केलेल्या सेवेचे मोठ्या आदराने वर्णन करून भाषणे पार पडली. टाळ्यांच्या कडकडाटात 'महात्मा' ही पदवी अर्पण करण्यात आली. अमर्याद प्रेमभक्ती, कृतज्ञता कार्यकर्त्यांच्या भाषणांतून व्यक्त झाली. त्यामुळे जोतीराव गहिवरले. जोतीरावांनी उत्तरादाखल भाषण केले. त्यात सत्यशोधक समाजाच्या कार्यक्रमांचा आणि फतव्यांचा उहापोह जोतीरावांनी केला. कार्यकर्त्यांना जोतीरावांनी धन्यवाद दिले. 'महात्मा' ही पदवी त्यानंतर अनेकांना मिळाली. फुल्यानंतरचे महात्मे म्हणजे गांधीजी होत.

जोतीरावांनी अंगिकारलेला, एका अर्थी दत्तक मुलगा यशवंत सोळा वर्षांचा झाला. त्या काळच्या रिवाजाप्रमाणे त्याच्या लग्नाला थोडासा उशीरच झाला होता. जोतीराव आणि सावित्रीबाई यांनी ग्यानोबा ससाणे या आपल्या मित्राकडे प्रश्न काढला. त्यांची मुलगी यशवंताला त्यांनी द्यावी, अशी अपेक्षा त्यांनी व्यक्त केली. ग्यानोबा ससाण्यांनी त्वरित रुकार दिला. ससाण्यांची मुलगी राधा भावी सून म्हणून जोतीरावांनी घरी आणली व तिला अभ्यास करण्यास सवड दिली. जुलै 1888 मध्ये जोतीरावांना अर्धांगवायूचा झटका आला. सयाजी महाराजांना बडोदे येथे ही अनिष्ट वार्ता मिळाली. सयाजीरावांनी ताबडतोब आर्थिक प्रश्न सोडविला. सप्टेंबर ते डिसेंबर 1888 हे चार महिने जोतीराव अंथरूणास खिळले होते. त्या मुदतीत ग्यानोबा ससाणे यांच्याशी

त्यांचा बराच पत्रव्यवहार झाला. आपल्या पत्रांवर 'सत्यमेव जयते' हे ब्रीदवाक्य ते लिहीत असत, ही गोष्ट त्या पत्रव्यवहारावरून लक्षात येते. हेच ब्रीदवाक्य स्वातंत्र्यानंतर भारताचे राष्ट्रीय बोधवाक्य झाले. ग्यानोबा ससाण्यांची मुलगी त्यांच्या घरी काही महिने राहिली. ही भावी सून बुद्धिवान आहे, तिची स्मरणशक्तीही चांगली आहे, ही गोष्ट त्यांच्या लक्षात आली. डिसेंबर 1888 शेवटचा आठवडा संकटमय ठरला; अर्धांगवायूचा दुसरा झटका जोतीरावांना आला. त्या वेळी राधेने प्रेमळपणे व कर्तव्यनिष्ठेने जोतीरावांची सेवा केली.

'दीनमित्र' पत्रामधून भालेकर मोठ्या धडाडीने सत्यशोधक समाजाचा प्रचार करीत होते. 'सोवळ्या वर्तमानपत्रांचे कसब' या शीर्षकाखाली असलेल्या लेखात दीनमित्रकार म्हणतात, ''आपल्या महाराष्ट्र देशात वर्तमानपत्रांचे पीक चढत्या मानाने येत आहे; परंतु शेतकरी, कारागीर वगैरे लोकांच्या सुधारणेसाठी बिलकूल प्रयत्न करीत नाहीत. लाखो रुपये दरसाल लोकल फंड घेत असता, सामान्यजनांची मुले ढ राहिली आहेत. दहा गावांस एकदेखील शाळा नाही. शेतकऱ्यांच्या नवीन कायद्यापासून सावकार ठार बुडाले, असे लिहितात; पण शेतकऱ्यांच्या झोपड्यांचे वासेसुद्धा सावकारांनी ठेवले नाहीत.''

फेब्रुवारी 1889 च्या पूर्वार्धात यशवंताचा विवाह झाला. सत्यशोधक समाजाच्या नियमांप्रमाणे मंगलाष्टके वधूवर आणि वऱ्हाडी मंडळी यांनी म्हटली. वऱ्हाडी मंडळींनी वधूवरांस आशीर्वाद दिला. 1889 च्या नोव्हेंबरमध्ये जोतीराव अंथरुणास खिळले असता, ब्रिटिश राजपुत्राचे आगमन झाले. पुणेकरांनी त्यांचा स्वागतसमारंभ मोठ्या गौरवाने केला.

या स्वागतसमारंभाची एक हकीकत अशी आहे : दीनबंधू सार्वजनिक सभेने कनिष्ठ वर्गातील मुलांना फुकट शिक्षण देणारी शाळा चालविली होती. राजपुत्र ज्या मार्गाने जाणार होते, त्या मार्गावर एके ठिकाणी या शाळेची मुले खालील वाक्ये लिहिलेल्या लाल आलवानाच्या पाट्या हाती धरून उभी होती. ''आपल्या आजीला सांगा (महाराणी व्हिक्टोरियाला) आम्ही सुखी राष्ट्र आहोत; तथापि एकोणीस कोटी शिक्षणाशिवाय आहोत.'' ही वाक्ये वाचून राजपुत्र ड्यूक ऑफ कॅनॉट व गव्हर्नर यांना कळवळा आला. हिंदुस्थानातील 95 टक्के जनता निरक्षर आहे, हे निदर्शनास आणण्याकरिता वरील वाक्ये उपयोगी पडली. कृष्णराव भालेकर या निदर्शनामागे होते. शेतकरी आणि अन्य गरीब ग्रामीणजन यांना फुकट सक्तीचे शिक्षण देणे आवश्यक आहे, हे यातून सुचवले जात होते. मुंबई येथे 1889 डिसेंबरमध्ये इंडियन नॅशनल काँग्रेसचे अधिवेशन भरले. तेथे सत्यशोधक कार्यकर्त्यांनी गवताचा पेंढा भरलेला शेतकऱ्याचा एक पुतळा उभारून काँग्रेसच्या मंडपापुढे लोंबत ठेवला. शेतकऱ्यांचे दारिद्र्य आणि दुःख यांची जाणीव राष्ट्रीय पुढाऱ्यांना व्हावी, असा त्याच्या पाठीमागे हेतू होता.

## दहा

# निर्मिक म्हणजे ईश्वर

जोतीरावांनी मृत्यूपूर्वी 'सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक' हा ग्रंथ लिहिला; पण तो त्यांच्या मरणोत्तर प्रसिद्ध झाला. या ग्रंथाच्या प्रस्तावनेत जोतीराव म्हणतात, ''या आपल्या अमर्याद विस्तीर्ण पोकळीमध्ये निर्मिकाने अनंत सूर्यमंडळासह त्यांच्या ग्रहोपग्रहांसहित तत्संबंधी एकंदर सर्व प्राणीमात्रास उत्पन्न केले आहे. त्यापैकी आपण सर्व मानव-स्त्रीपुरुषांनी त्याचे स्मरण मनी जागृत ठेवून एकमेकांशी कोणत्या तऱ्हेचे आचरण केल्यामुळे त्यास आनंद होणार आहे; यास्तव मी त्यांच्या कृपेने एकंदर सर्व मानव-स्त्रीपुरुषांच्या हितासाठी हा लहानसा ग्रंथ रचिला आहे. तो सर्वांस ग्राह्य होऊन आम्ही सर्वांनी निर्मिकाच्या सत्यमय राज्याचा सारखा उपभोग घेऊ लागावे म्हणून माझी त्यापाशी मागणी आहे.''

जोतीरावांनी जरी ब्राह्मण धर्मग्रंथांविरुद्ध बंड केले तरी ते हिंदू तत्त्वज्ञानातील मुख्य तत्त्वाला चिकटूनच राहिलेले दिसतात. देवाच्या राज्याची ह्या भूतलावर स्थापना व्हावी, ऐहिक साम्राज्याची नव्हे, हाच त्या तत्त्वाचा प्राण आहे.

जोतीरावांनी हिंदूंच्या भोळ्या समजुती, चालीरीती, कर्मठ नि तर्कदुष्ट संस्कार, धार्मिक विधी व धर्मतत्त्वे ह्यांचा त्याग केला आणि इतर हिंदू संस्कारांना साधे नि संक्षिप्त रूप दिले, हे सत्यशोधक समाजाच्या बहुतेक नेत्यांनी मान्य केले आहे.

डॉ. विश्राम रामजी घोले हे 1888 सालच्या एप्रिल महिन्यात नोकरीतून निवृत्त झाले. त्यांनी जोतीरावांच्या या ग्रंथाला प्रस्तावना लिहिली आहे. त्यात ते म्हणतात : ''असत्य धर्म, मूर्तिपूजा व जातिभेद यांच्या योगाने हिंदुस्थानात किती गोंधळ व हानी झाली आहे, त्याचे ह्यात उत्तम रीतीने दिग्दर्शन केले आहे. परमेश्वर कसा आहे, त्याची आकृती कशी आहे, त्याला कोणी पाहिले नाही, असे असता त्याची मूर्ती कशी करिता येईल ? जातिभेद ज्या रीतीने हल्ली प्रचारात आहेत त्यापासून अनेक तोटे होत आहेत, हे सर्वांच्या लक्षात घेऊन चुकले आहे. त्याविषयी येथे आम्ही इतकेच म्हणतो की, हिंदुस्थानास निकृष्टदशा प्राप्त होण्याला, परस्पर द्वेष वाढण्याला, अनेक तंटे उपस्थित होण्याला व आपणास दास्य येण्याला हे एक प्रखर कारण आहे.''

''सुमारे गेल्या चाळीस वर्षांत,'' डॉ. घोले पुढे म्हणतात, ''रा. रा. जोतीराव गोविंदराव फुले यांनी धार्मिक व व्यावहारिक विषयांवर अनेक व्याख्याने दिली. स्वबांधवांशी वादविवाद करून लोकांच्या मनावरील भ्रम उडविला. काही ग्रंथ व पोथ्या लिहून लोकांस अर्पण केल्या. वर्तमानपत्रांत या विषयांवर चर्चा करीत आले व करीत आहेत, अनेक कवने करून लोकांस उपदेश केला. इत्यादि कामे करून आपला देह लोकसेवेत झिजविला व अजून लोकसेवा करीत आहेत. त्यांनी धर्मप्रकरणी सत्यासत्य व कार्यकारण भाव यांचा शोध लावण्यास लोकांस संवयी लावल्या. अमूक चाली बऱ्या किंवा वाईट यांचा न्याय त्यांपुढे मांडला. मूर्तिपूजेचे खंडन केले. एकेश्वरी धर्माचे मंडन केले.''

''धर्म, कर्म व व्यवहार यांत लोक नाडले जाऊ नयेत म्हणून त्यांच्या समजुती पाडल्या, इत्यादि कार्ये करून त्यांनी लोकांवर सदुपकार केले. ह्यांच्या बहुत वर्षांच्या मेहनतीचे वृक्ष जिकडे तिकडे वाढून त्यांस आता फळे येऊ लागली आहेत व पुष्कळ लोक हळूहळू एका परमेश्वरास मानू लागले आहेत. असत्य धर्माचा भोपळा फुटत चालला आहे व त्यांतील मर्मे लोकांस समजू लागली आहेत. पुराणे ही केवल कादंबऱ्या व कल्पित गोष्टी आहेत असा लोकांचा समज होत चालला आहे.'' डॉ. घोले यांनी जोती-तत्त्व-प्रणालीचा निष्कर्ष काढला तो असा : ''एका ईश्वरास भजावे. सद्वर्तनाने वागावे. सर्वांनी बहिणभावंडांप्रमाणे वर्तावे. सर्व मनुष्यांना सारखेच हक्क असावेत. जातिभेद नसावा. स्त्रियांना व पुरुषांना सारखेच हक्क असावे व हल्लीच्या अनेक वाईट चाली ज्यांचा संबंध धर्माशी लावला आहे, त्या सोडाव्या. ह्या ग्रंथातील भाषा सुलभ आहे. ह्यातील हितोपदेश चांगला आहे. धर्मभोळेपणा व धर्मवेड, हा ग्रंथ वाचल्याने जाईल अशी आमची खात्री आहे. हा ग्रंथ यहुदी, ख्रिस्ती व मुसलमान वगैरे सर्व धर्मातील लोकांनी संग्रहास ठेवावा अशी आम्ही शिफारस करितो.''

जोतीरावांनी ''सत्यवर्तन केल्याशिवाय मानवप्राणी जगात सुखी होणार नाही'' ह्या तत्त्वाने सार्वजनिक 'सत्यधर्म पुस्तक' ग्रंथाला आरंभ केला आहे.

सत्य सर्वांचे घर ॥ सर्व धर्मांचे माहेर ॥
जगांमाजी सुख सारे ॥ खास सत्याचीं ती पोरे ॥ १ ॥
सत्य सूखाला आधार ॥ बाकी सर्व अंधकार ॥
आहे सत्याचा बा जोर ॥ काढी भंडाचा नीर ॥ २ ॥
सत्य आहे ज्यांचे मूळ ॥ करी धूर्तांची बा राळ ॥
बळ सत्याचें पाहूनी ॥ बहुरूपी जळे मनी ॥ ३ ॥
खरे सुख नटा नोव्हे ॥ सत्य ईशा वर्जू पाहे ॥
जोती प्रार्थी सर्व लोकां ॥ व्यर्थ दंभा पेटूं नका ॥ ४ ॥



आपल्या ग्रंथात जोतीराव पुढे म्हणतात : ''ह्या पृथ्वीच्या पृष्ठभागावर जेवढी म्हणून मानवांनी धर्मपुस्तके केली आहेत, त्यांपैकी एकाही ग्रंथात आरंभापासून शेवटापर्यंत सारखे 'सार्वजनिक' सत्य नाही. कारण प्रत्येक धर्मपुस्तकामध्ये काहीएक व्यक्तींनी त्या वेळच्या प्रसंगास अनुसरून हेकटपणा केल्यामुळे, ते धर्म एकंदर सर्व मानवी प्राण्यांस सारखे हितकारक न होता, सहजच त्यांमध्ये अनेक फळ्या होऊन त्या एकमेकांचा मनापासून हेवा व द्वेष करू लागतात.''

सबंध ग्रंथाचा सारांश शक्यतो जोतीरावांच्या शब्दांत थोडा पुनरावृत्तीचा दोष पत्करूनही पुढीलप्रमाणे आम्ही देत आहोत : ''जर निर्माणकर्ता आपण सर्व मानवांचा निर्मिक आहे तर एकंदर सर्व मानवी प्राण्यांपैकी प्रत्येक व्यक्तीस त्याने कृपाळू होऊन एकंदर सर्व उत्पन्न केलेल्या मानवी अधिकारांचा यथायोग्य उपभोग घेता यावा. असे घडून येत नसल्यामुळे त्यास अनेक प्रकारच्या दुःसह अडचणी सोसाव्या लागतात. पृथ्वीवरील अनेक देशांतील लोकांचा एकमेकांशी वैरभाव माजून प्रत्येकामध्ये देशाभिमानाचे व धर्माभिमानाचे खूळ व्यर्थ माजले आहे. पृथ्वीवरील अनेक देशांतील नद्या महासागरास मिळतात. त्यांपैकी एकाच देशांतील नदी पवित्र कशी असेल ? कारण ती महापवित्र नदी श्वानाचे मलमूत्र पोटात घेऊन समुद्रात वाहून नेते. एकंदर सर्व मानवी प्राणी अवयवाने व बुद्धिकौशल्याने एकसारखे असून, त्यांपैकी काही लोक पिढीजात पवित्र बनून श्रेष्ठ कसे होऊ शकतील ? सर्वांसारखे त्यांस जन्ममरण व सर्वांप्रमाणे सद्गुणांत व दुर्गुणांत ते निपुण असतात.

''निर्माणकर्ता कसा नि कुठे आहे, हे जाणण्याची मनुष्याने इच्छा न केलेली बरी. विश्वाची पोकळी अथांग, अनंत आहे. एकाही दिशेचा मनुष्यास शोध लावणे अशक्य आहे. तेव्हा यत्किंचित मानवास निर्मात्याचा शोध लावणे अशक्य आहे. तो अज्ञेय आहे. कल्पित विष्णूच्या नाभिकमळातून उत्पन्न झालेल्या ब्रह्मदेवांनाही निर्मात्याचे दर्शन झालेले नाही.

''पृथ्वीवरील पुष्पे नि सुवासिक पदार्थ मानवाच्या उपभोगासाठी निर्माणकर्त्याने उत्पन्न केले आहेत, तर ते त्याला वाहून त्याची पूजा करण्यात अर्थ नाही. स्वपरिश्रमाने आपल्या कुटुंबांचे पोषण करून रात्रंदिवस जगाच्या कल्याणासाठी झटणारे म्हणजे अज्ञानी मानव बांधवांस आपमतलबी व स्वकार्यसाधू लोकांच्या जाळ्यांतून मुक्त करणारे अशा सत्पुरुषांस फुलांच्या माळा करून ईश्वराच्या नावाने अर्पण कराव्यात म्हणजे पुष्पांचे सार्थक होईल.

''दगडाच्या मूर्तीवर पुष्पे वाहून नामस्मरण केल्यास मनुष्यास काही फायदा नाही. पीतांबर नेसून धूप घालून, नाक धरून, डोळे मिटून निर्मिकाचे दर्शन होत नाही. निर्मिकाच्या नामघोषाने आपल्या मात्यापित्यांचे पालनपोषण होणार नाही. आपल्या परिश्रमाने उदरनिर्वाह न करिता अथवा जगाच्या हितासाठी न झटता आपले पोट

जाळण्याप्रीत्यर्थ बहुरूप्यासारखे ढोंगी बैराग्याचे सोंग घेऊन सर्वकाळ भांग पिऊन तिच्या अमलांत अज्ञानी भोळ्या जगाचे मिष्टान्नावर नित्य ताव मारून जे निरर्थक नामस्मरण करितात ते विचारवंताच्या उपहासास पात्र होतात. ईश्वराचे आभार मनात बाळगून सर्वांनी बहिणभावंडांसारखे वागले असता, एकंदर सर्व मानवप्राणी सुखी होऊन साक्षात निर्मिकाचा अंमल बसून त्याचे राज्य होणार आहे.

''निर्मिकाला नैवेद्याची जरुरी नाही. साधुपुरुषांना विपत्काल आला, तर त्यांना किंवा पंगु माणसांना साहाय्य केले तर निर्मिकास नैवेद्य अर्पण केल्याचे श्रेय मिळेल. कोणत्याही प्रकारचा भेदाभेद न करता एकंदर सर्व मानवांपैकी जो कोणी आपल्या कुटुंबाचे पोषण करून जगाच्या कल्याणासाठी सतत रात्रंदिवस झटतो, मग तो भटभिक्षुक असो किंवा रेडइंडियन असो किंवा मृतप असो, त्याला साहाय्य केले तर तो निर्मिकासच नैवेद्य अर्पण होणार आहे.

''स्वर्ग हे एक बुजगावणे आहे. सर्व धर्मपुस्तकात स्वर्ग वर्णिला आहे. तो कल्पित आहे. पृथ्वीवर असा स्वर्ग नावाचा भूभाग नाही.

''स्त्री आणि पुरुष ह्या उभयतांमध्ये स्त्री श्रेष्ठ आहे. सर्वांचे उपकार फिटतील; परंतु आपल्या जन्मदात्या मातु:श्रीचे उपकार फिटणार नाहीत. स्त्री घरात असल्याशिवाय घर शोभत नाही. ती निरपेक्षपणे सर्वांचा पाठिराखेपणा करते. स्त्री अबला असते. पुरुष लोभी नि धाडसी, तिला त्यांनी दडपून ठेविले. तिला मानवी हक्क समजू नये म्हणून तीस विद्या शिकविण्याचा प्रतिबंध केला.

''बहुपत्निकत्वाची चाल वाईट आहे. पुरुषाच्या लोभामुळे हेवा, द्वेष, नाना तऱ्हेचे निर्माण झाले. व्यसनी पुरुष स्वस्त्रीशी प्रतारणा करून अनेक बायका करितात आणि त्यांजबरोबर मन:कामना तृप्त करण्याचे नादात पडल्यामुळे नाना प्रकारचे घाणेरडे रोग निर्माण होऊन ते सर्व ठिकाणी पसरतात. मदोन्मत्त पुरुषाने रजस्वला स्त्रीबरोबर संग केल्यामुळे महारोग होतो. तो संततीतसुद्धा पसरतो. विधुर लावण्यवती अज्ञानी मुलीशी लग्न करून त्या अबलांच्या तारुण्यांत माती कालवितात. परंतु त्या मुली विधवा झाल्या म्हणजे त्यांना द्वितीय संबंध करावयास देत नाहीत. त्या गर्भपात, बालहत्या करतात. आर्यभटांनी विधवा विवाहास बंदी केली. भोळसर अज्ञानी कुळवाडी, सोनार वगैरे जातींतील लोकांनी त्यांचे अनुकरण केले. वैदिक काळी आर्य ब्राह्मणाला भावजयीशी संभोग करून मुले निर्माण करण्यास परवानगी होती.

''लोभी पुरुष दोन तीन लग्नाच्या बायका करून नांदतात. त्यासाठी धर्मग्रंथाचा आधार दाखवितात. दोन तीन नवरे करून एक एक स्त्री एका घरात नांदू लागली तर कसे होईल ? स्त्रियांस एक नियम व पुरुषांनी स्वार्थासाठी बनावट मतलबी धर्मपुस्तकांत स्त्रियांविषयी असे आपमतलबी लेख करून ठेविले आहेत.



''एकंदर सर्व मानवी प्राण्यांस कायिक व मानसिक पीडा दिली नाही म्हणजे त्यासच पुण्य म्हणावे. परोपकार पुण्याय पापाय परपीडनम्. धर्माच्या नावावर गरिबांची फसवणूक करून ब्राह्मणांना भोजन देणे म्हणजे पुण्य नव्हे. वेश्यागमन करणे, मटण दारू यांवर चैन करणे आणि ते झाल्यावर अस्पृश्यता पाळणे हे पुण्य नव्हे.

''जातिभेद पाळणे हा धर्म नव्हे. मानवी प्राण्यात मुळात जातिभेद आहेत हे थोतांड आहे. ब्राह्मणांनी आपल्या स्वार्थासाठी हे जातिभेद निर्माण केले. जर हलाल खोरिणीची जात नीच मानली तर आपली माता त्याच वर्गाची ठरवावी लागेल आणि आपल्या आईला नीच म्हणणारा असा निर्दय, कृतघ्न कोणी मनुष्य नसेल. मानवप्राण्यांत त्यांच्या गुणावरून जातिभेद ठरविता येणार नाहीत. सद्गुण व दुर्गुण हे काही पिढीजात स्वभाव नाहीत. ब्राह्मणांची मुले स्वभावाने नेहमी शंकराचार्यांच्या तोलाची सद्गुणी निपजत नाहीत. अतिशूद्र चांभाराची मुले सद्गुणी निपजल्यास शंकराचार्यांच्या तोलाचे महामुनी होणार नाहीत, असे न्यायी पुरुषाच्याने म्हणवणार नाही.

''पशुपक्षी नि मानव यांत स्वाभाविक भेद आहे. तो भेद म्हणजे निर्मिकाने मानवप्राण्यास सारासार विचार करण्याची बुद्धी दिली आहे. बुद्धीहीन पशुपक्ष्यादी प्राणी या लोभी मानवांपेक्षा फार मोठे आहेत.

''धंदा म्हणजे धर्म नव्हे. हजामत करणे हा न्हाव्याचा धंदा आहे, धर्म नव्हे. कपडे धुणे धोब्याचा धंदा आहे, धर्म नव्हे. तो धंद्याने धोबी आहे. जातीने किंवा धर्माने नव्हे. अज्ञानी जनापासून लाच खाणे हा सरकारी कामगाराचा धर्म नव्हे, हे त्याचे सरकारशी दगेबाजी करण्याचे कसब होय. मेहनत न करिता अज्ञानी जनांस लुटून आयते खावे हा आर्यभटाचा धर्म नव्हे, ही उघड ठकबाजी होय. वेश्यांचा मुखरस पिऊन घरी आल्याबरोबर सोवळेचार करणे हा सज्जन मानवांचा धर्म नव्हे. ही अपवित्रता होय. निर्वाहाकरिता पडझड जनावरे खाणे हा मांगमहार यांचा धर्म नव्हे. हा त्यांचा लाचारपणा, निरुपाय होय. रयतेचे संरक्षण करण्यासाठी रयतेकडून करपट्टी घेणे हे राजाचे कर्तव्यकर्म होय, धर्म नव्हे. बैरागी, गोसावी हे समाजाच्या जिवावर आपला निर्वाह करतात, ते आईतखाऊ होत.

''निर्मिकाने सर्वमानवी स्त्रीपुरुषांच्या सुखासाठी अन्न, फळे, फुले, पाणी निर्माण केली. परंतु मानव स्त्रीपुरुषांनी एकमेकांविषयी बहिणभावंडपणाची पवित्रवृत्ती जागृत न ठेविल्यामुळे जगामध्ये सत्याचा ऱ्हास होत गेला व त्यामुळे एकंदर सर्व जगात असंतोष होऊन दु:खाचे प्राबल्य झाले. सत्यास स्मरून वागल्याशिवाय त्यांमध्ये निर्मळ भाऊपणा जागृत होणार नाही.

''मानवांनी आपली माता, भगिनी, कन्या, सुना ह्यांना दासीसारखे वागविले. जर त्यांच्या मानवी हक्कांच्या आड ते आले नसते, तर जगामध्ये निर्मिकाचे राज्य होऊन

एकंदर सर्व मानव स्त्रीपुरुष संतोषी होऊन सुखी झाले असते. जसे माणसांनी तुम्हांसी वर्तावे म्हणून तुमची इच्छा आहे, तसेच तुम्हीही त्यांशी वर्ता, असे महासत्पुरुषांचे वचन आहे.

''आर्यांच्या धर्मात भट्टब्राह्मणांखेरीज बाकीच्या एकंदर सर्व लोकांस नीतीचा सारखा उपभोग घेण्यासारखी मुळीच मोकळीक नाही. रामायण व भागवत यांच्या इतिहासात एकंदर सर्व नीती खरी व विश्वसनीय नाही. जर रावण हा मानवाव्यतिरिक्त राक्षसाच्या जातीचा होता, तर जनक राजाने या परजातीच्या रावणास आपल्या मुलीच्या स्वयंवराच्या समारंभास येण्याचे आमंत्रण दिले नसते. रामायणातील इतिहास खरा नाही. त्या वेळच्या गप्पाड्या नाटक्यांनी केवळ लोकांची मते रिझविण्याकरिता हा ग्रंथ कल्पून रचिला असावा. या सर्वांत नीतीचा गंध नाही.

''महंमदी धर्मात खुदाने निर्माण केलेल्या मानवास एकमेक भावंडाप्रमाणे मानितात. त्याचप्रमाणे एकंदर सर्व मानवांस त्यांचे पवित्र कुराण वाचून पाहण्याची व त्याप्रमाणे आचरण करण्याची मोकळीक आहे. सर्वास बरोबरीचे हक्क देऊन त्याचबरोबर रोटी व बेटीव्यवहार सुरू करण्याची मोकळीक आहे.

''आपल्या सर्वांच्या निर्मिकास संतोष देण्यासाठी सार्वजनिक सत्याचे भय मनी धरून जो कोणी इतर मानवबांधवांबरोबर आचरण करील त्यास नीती म्हणावी. मग तो ख्रिस्ती असो, महंमदी असो, सत्यशोधक समाजीय असो, अथवा एखादा गावडेकरी अज्ञानी असो.'' राम आणि श्रीकृष्ण यांची काही बाबतीतली वागणूक देवाला शोभण्यासारखी नव्हती, असे जोतीरावांनी म्हटले आहे. त्यांनी ज्ञानेश्वरीच्या बाराव्या नि तेराव्या अध्यायांवर कडक टीका केली आहे.

''देव, ब्रह्मलिखित, पूर्वसंचित, नशीब, प्रारब्ध, प्राक्तन, सुकृत, ललाटरेषा हे सर्व कल्पित धोरणाने मानलेले कर्म आहे. ते सर्व मिथ्या आहे. मना त्वाचि रे पूर्वसंचित केले, तयासारिखे भोगणे प्राप्त झाले ।। हे रामदासांचे म्हणणे चुकीचे आहे. स्वभावतः विद्या शिकण्याची गोडी नसेल तो मुलगा नापास झाला तर लोक म्हणतात, विद्या शिकणे त्याच्या दैवात नव्हते. एखाद्याने आपण होऊन अभ्यास केला, तर त्याच्या नशिबात विद्या होती असे म्हणतात. धंद्याची पूर्ण माहिती नसल्यामुळे व पूर्वतयारी न केल्यामुळे आणि अज्ञानामुळे अपयश येते.

''बायबल सर्वांना वाचण्याची मोकळीक आहे. कुराण सर्वांना खुले आहे. वेद सर्वांना खुले नाहीत. बायबल आणि कुराण ह्यांवर विश्वास असणाऱ्या लोकांना दुसरी कसली भीती वाटत नाही. वेदावर विश्वास असणारे भितात. कारण त्यांतली लबाडी उघडकीस येईल असे त्यांना वाटते. ब्राह्मणी ग्रंथ हे बाह्यातकारी धर्मसंबंधी, परंतु आतून ते शुद्ध राजकीय आहेत. वेद हे सार्वजनिक ईश्वरप्रणीत सत्याच्या नावाला बिलकूल शोभण्यासारखे नाहीत.

## अकरा

# सत्यवर्तन म्हणजेच धर्म

जोतीरावांनी धर्मासंबंधी आणखी एका महत्त्वाच्या प्रश्नाची चर्चा 'सार्वजनिक सत्यधर्म' पुस्तकांत केली. सत्यवर्तन करणारे कोणास म्हणावे ? हा तो प्रश्न. जोतीरावांचे याबाबतचे म्हणणे आम्ही सारांश रूपाने आता सादर करत आहोत. ''स्त्री पुरुषे हे उभयतः जन्मताच स्वतंत्र व एकंदर सर्व अधिकाराचा उपभोग घेण्यास पात्र केले आहेत असे कबूल करणारे त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे. जे तारे, दगड यांची पूजा न करिता विश्वाच्या निर्मिकास मान देतात, ते सत्यवर्तन करतात असे म्हणावे. निर्माणकर्त्याने निर्माण केलेल्या सर्व वस्तूंच्या यच्चयावत प्राणीमात्रास उपभोग घेऊ न देता ते निर्मिकास अर्पण करून जे त्याचे पोकळ नामस्मरण करतात ते सत्यवर्तन करत नाहीत.

''जे प्राणीमात्रांस कोणत्याही प्रकारचा निरर्थक त्रास देत नाहीत, ते सत्यवर्तन करतात. जे दुसऱ्यांस मानवी अधिकार उपभोगून देतात, त्यांना व्यक्तिशः वा सांघिकरित्या विरोध करीत नाहीत ते सत्यवर्तन करतात.

''सर्व स्त्रीपुरुषांस धर्म व राजकीय स्वतंत्रता आहे. जो दुसऱ्याचे हक्क समजून घेऊन इतरांस पीडा देत नाही, त्यांचे नुकसान करीत नाही तो सत्यवर्तन करणारा म्हणावा. पुरुषाने आपली पत्नी, स्त्रीने आपला पती ह्यांखेरीज इतर स्त्रीपुरुष बंधुभगिनी आहेत, असे जे विचार ठेवतात त्यांना सत्यवर्तन करणारे म्हणावे.

''सर्व स्त्रीपुरुषांस सर्व मानवी हक्कांविषयी आपले विचार, मते, बोलून दाखविण्यास अथवा लिहिण्यास आणि प्रसिद्ध करण्यास स्वतंत्रता दिली आहे; परंतु त्या विचारांपासून व मतांपासून दुसऱ्यांचे नुकसान होऊ नये म्हणून जे खबरदारी घेतात त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे. दुसऱ्यांच्या मतांवरून किंवा राजकीय मतांवरून जे त्यास नीच मानून त्याचा छळ करीत नाहीत, त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे. गावकी किंवा मुलकी अधिकाराच्या जागा स्त्रीपुरुषांच्या योग्यतेनुरूप व सामर्थ्यानुरूप मिळाव्यात असे मान्य करतात, त्यांना सत्यवर्तन करणारे म्हणावे.

''धर्म, गावकी व मुलकी यासंबंधाची प्रत्येक मानवाची स्वतंत्रता, मालमत्ता, संरक्षण

आणि त्याच्या जुलमापासून बचाव करण्याविषयी जे कोणी बाधा आणीत नाहीत, त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे.

''स्त्री अथवा पुरुष जे मानव वृद्ध शिष्टांस सन्मान देतात, वृद्ध मातापित्यांचा परामर्श घेतात त्यांना सत्यवर्तन करणारे म्हणावे. स्त्री अथवा पुरुष जे वैद्याच्या आज्ञेवाचून अफू, भांग, मद्य वगैरे अमली पदार्थांचे सेवन करून नाना तऱ्हेचे अन्याय करण्यास प्रवृत्त होत नाहीत अथवा ते सेवन करणारास आश्रय देत नाहीत त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे.

''पिसू, ढेकूण, ऊ वगैरे कीटक, विंचू, सरपटणारे सर्प, सिंह, वाघ, लांडगे वगैरे आणि त्याप्रमाणे लोभी मानव दुसऱ्या मानव-प्राण्यांचा वध करतात.

''ह्यांखेरीज दुसऱ्या प्राण्यांची वा मानवांची जे हत्या करीत नाहीत अथवा हत्या करणारांस मदत देत नाहीत त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे.

''स्त्री अथवा पुरुष जे आपल्या हितासाठी दुसऱ्यांचे नुकसान करण्याकरिता लबाड बोलत नाहीत अथवा तसे बोलणारास मदत करीत नाहीत त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे.

''स्त्री अथवा पुरुष जे व्यभिचार करीत नाहीत अथवा चोरीस मदत करीत नाहीत, त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे.

''स्त्री अथवा पुरुष जे स्वतःच्या हितासाठी न्यायाने राज्य करणाऱ्या संस्थानिकांवर अथवा राज्यावर अथवा एकंदर सर्व प्रजेने मुख्य केलेल्या प्रतिनिधीवर बंड करून लक्षावधी लोकांची कुटुंबे उघडी पाडीत नाहीत अथवा बंड करणारास मदत करीत नाहीत, त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे. जगाच्या हितासाठी धर्मपुस्तक तयार केले आहे अशी बढाईने वाचाळपणा करणारे, परंतु ते धर्मपुस्तक स्वतःच्या बगलेत मारून इतर मानवांस न दाखविणारे अशा कपटी बढाईखोरांवर जे स्त्रीपुरुष विश्वास ठेवीत नाहीत त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे.

''स्त्री अथवा पुरुष जे आपल्या कुटुंबासह आपल्या भाऊबंदास, आपल्या सोयऱ्याधाऱ्यांस आणि इष्टमित्र साथी यास मोठ्या तोऱ्याने पिढीजात श्रेष्ठ मानून आपल्यास पवित्र मानीत नाहीत आणि दुसऱ्या मानवांना पिढीजाद कपटाने अपवित्र मानून त्यांस नीच मानीत नाहीत त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे.

''स्त्री अथवा पुरुष जे पूर्वी कपटाने लिहिलेल्या ग्रंथांच्या वहिवाटीवरून काही मानवांस इतर लोकांच्या मुलांविषयी दुजाभाव बाळगीत नाहीत अथवा शाळेत शिकविताना दुजाभाव करणाऱ्यांचा धिःक्कार करितात त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे. स्त्री अथवा पुरुष जे न्यायाधिशाचा हुद्दा चालवताना अन्यायी लोकांना त्यांच्या अन्यायानुसार योग्य शिक्षा करण्याच्या कामी कधीही पक्षपात करीत नाहीत, अन्यायाने पक्षपात करणाऱ्यांचा धिक्कार करतात त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे.



''जे स्त्री अथवा पुरुष जे स्वतः काही उद्योगधंदा न करिता निरर्थक धार्मिकपणा डौल घालून अज्ञानी जनांस नवग्रहांची पीडा दाखवून त्यांस भोंदाडून खात नाहीत अथवा तत्संबंधी पुस्तके करून आपली पोटे जाळीत नाहीत त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे.

''स्त्री अथवा पुरुष जे भाविक मूढांस फसवून खाण्याकरता ब्राह्मणांचे सोंग घेऊन त्यांस अंगारा, धुपारा देत नाहीत, अथवा तत्संबंधी मदत करीत नाहीत, त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे.

''स्त्री अथवा पुरुष जे आपली पोटे जाळण्याकरिता अज्ञानी जगात उपस्थिती करीत नाहीत अथवा तत्संबंधी मदत करणाऱ्यांच्या सावलीदेखील उभे राहत नाहीत त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे.

''स्त्री अथवा पुरुष जे स्त्रीपुरुषांमध्ये कोणत्याच तऱ्हेची आवडनिवड न करिता त्याचे खाणेपिणे, लेणे व नेसणे याविषयी कोणत्याच प्रकारचा विधिनिषेध न करिता त्यांच्याबरोबर शुद्ध अंतःकरणाने आचरण करितात त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे. सर्व मानव स्त्रीपुरुषांपैकी कोणाची आवडनिवड न करितां त्यांतील महारोग्यांस, पंगूंस व पोरक्या मुलांस आपल्या शक्तीनुसार मदत करितात अथवा त्याला मदत करणाऱ्यांस सन्मान देतात त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावे.

''भूमंडळावर महासत्पुरुषांनी म्हणून धर्मपुस्तके केली आहेत. त्या सर्वांत त्या वेळेस अनुसरून त्यांच्या समजुतीप्रमाणे काही मा काही सत्य आहे. यास्तव कोणत्याही कुटुंबातील एका मानव स्त्रीने बौद्धधर्मी पुस्तक वाचून तिच्या मर्जीप्रमाणे पाहिजे असल्यास तो धर्म स्विकारावा. तिच्या पतीने बायबल वाचून त्याच्या कन्येने कुराण वाचून तिच्या मर्जीप्रमाणे पाहिजे असल्यास तिने महंमद धर्मी व्हावे आणि त्याच कुटुंबातील त्यांच्या पुत्राने सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक वाचून त्याच्या मर्जीप्रमाणे पाहिजे असल्यास सार्वजनिक सत्यधर्मी व्हावे. कोणी कोणाचा द्वेष न करिता सर्वांना निर्मिकाच्या कुटुंबातील आहोत असे समजून प्रेमाने व गोडीगुलाबीने एकमेकांनी वर्तन करावे म्हणजे ते आपल्या सर्वांच्या निर्माणकर्त्याच्या राज्यात धन्य होईल.

''आकाशातील ग्रहांशी मानवाचे भवितव्य निगडित नाही. ग्रह महान व्यक्तींस पीडा देत नाहीत. ही पोटबाबू आर्य जोशांची लबाडी आहे.

''मनुष्यास कन्या व पुत्र झाल्याबरोबर आनंद होतो. कन्येच्या नावाचा संस्कार बाराव्या दिवशी, पुत्राच्या नावाचा तेराव्या दिवशी करावा. मातेच्या स्तनात दूध पुरे असल्यास मुलास सहा महिन्याच्या आत कोणत्याही प्रकारचा अन्नसंस्कार करू नये. मुलांस अथवा मुलीस बोलता येऊ लागल्याबरोबर आईने त्यास लहान वाक्ये बोलावयास लावून त्याच्याकडून मुळाक्षरे खेळता खेळता पाठ करून घ्यावीत. पाचवे वर्ष लागताच त्याला शाळेत घालावे.

''कन्यापुत्रांनी आपल्या मात्यापित्यासह वडील इष्टमित्रांचा सल्ला घेऊन त्यांनी मागेपुढे पाहून सारासार विचार करावा आणि लग्न जुळवावे. लग्नाच्या वेळी सद्वर्तनाने वागण्याविषयी प्रतिज्ञा करावी. नंतर गरिबांस, अंधपंगूस जातपातधर्मनिरपेक्ष दानधर्म करावा.

''जे अनीतीने वागलेले असतात त्यांना मरणकाळी पश्चात्ताप झाल्यामुळे क्लेश होतात. मानव स्त्रीपुरुष आपली लग्ने झाल्यावर जे निर्मळ अंत:करणाने सत्यास स्मरून एकमेकांशी जेव्हा सर्वकाळ स्वकामी सत्य आचरतात, आपले सर्व आयुष्य घालवितात, यास्तव मरण आले की ते शांतपणे आपले प्राण सोडतात.

''मनुष्याने मरणापूर्वी शुद्धीवर असता आपल्या कन्यापुत्रांसह कुटुंबातील एकंदर सर्व तरुणांस त्यांविषयी बोध करून एकंदर सर्व सोयरेधायरे, इष्टमित्र वगैरेंचा निरोप घ्यावा आणि शांतपणे प्रार्थना करावी, ती अशी :

'मला निर्माण करून मला सदसद्विचार करण्याची बुद्धी दिलीस व तुझ्या आज्ञेप्रमाणे सत्यास स्मरून मी या जगात वर्तन केले, हे तू जाणतोस. यास्तव तू माझा अंगीकार करशील अशी माझी पूर्ण खात्री आहे आणि त्याचप्रमाणे माझ्या बाकी एकंदर सर्व मानव बहिणभावंडांनी सत्यास स्मरून आचरण केल्याबरोबर, त्यांचाही अंगीकार नि:संशय करशील. तुझी सत्यसत्ता वाढो.'

''प्रेतास स्नान घालून अंगास तेल लावावे. त्यास वस्त्रे नेसवावीत. त्यावर पुष्पांच्या माळा घालाव्यात. प्रेताची गती लावण्यापूर्वी अंगावरची वस्त्रे काढू नयेत.

''स्मशानातून घरी जाण्यापूर्वी एखाद्या सत्यपालक वृद्धाने प्रार्थना करावी. तेराव्या दिवशी शक्यतेनुसार सखेसोयरे, भाऊबंद, इष्टमित्र यांना भोजन देऊन सर्वांच्या गळ्यात पुष्पांच्या माळा घालाव्यात. शक्यतेनुसार काही द्रव्य देऊन शाळेत जाणाऱ्या त्यांच्या मुलांमुलींना मोठ्या उत्साहाने गाई बक्षीस कराव्यात. वर्षश्राद्धाच्या दिवशी तसेच भोजन द्यावे. निराश्रित मुलांमुलींना त्या दिवशी साहाय्य करावे.''

असा हा जोतीरावप्रणीत धर्म आहे. ज्याच्यायोगे सर्व समाजाचे धारण होते तो धर्म. म्हणूनच त्यांनी आपल्या धर्मास 'सार्वजनिक सत्यधर्म' म्हटले आहे.

## बारा

# जोतीरावांचा मृत्यू

जोतीराव अर्धांगवायूशी झगडत असताना त्या आजारीपणात जानेवारी 1890 मध्ये त्यांना एक मोठा विजय मिळाला. ओतूर या गावच्या बाळाजी कुसाजी पाटील या गृहस्थाने ब्राह्मण पुरोहिताला न बोलाविता आपल्या घरचे लग्न लावले. सत्यशोधक समाजाच्या पद्धतीने ते लग्न लागले. वधूवरांनी एकमेकांच्या गळ्यात हार घालण्यापलीकडे कोणताच संस्कार केलेला नव्हता. त्या वेळी ग्रामपुरोहिताचा दक्षिणेवर हक्क चालू शकत नाही, असा निकाल सर्वोच्च न्यायालयाचे मुख्य न्यायमूर्ती सर चार्लस सार्जंट यांनी दिला व ग्रामपुरोहिताचा लग्न-संस्कारातील दक्षिणेचा हक्क अमान्य केला. सत्यशोधक समाजाच्या चळवळीचा हा महत्त्वाचा विजय ठरला. मुंबई नगरपालिकेतील भंगी 1889 साली आपली गाऱ्हाणी दूर करण्याकरिता जून आणि जुलैमध्ये संपावर गेले. त्यांनाही विजय मिळाला.

वरिष्ठ जातीतील विधवांचे केशवपन जबरदस्तीने होत होते. त्याविरुद्ध जोतीरावांच्या अनुयायांनी खळबळ उडवून देणारी चळवळ सुरू केली. 'ज्ञानप्रकाश' सारख्या वृत्तपत्राने या चालीचा वारंवार धिक्कार चालविला. हे केशवपनाचे प्रकरण सगळीकडे पसरू लागले. 'दीनबंधू'कारांनी या चालीच्या विरुद्ध लेखमाला लिहिली आणि न्हाव्यांना विनंती केली, की त्यांनी हे केशवपन करू नये. मुंबईतील थोर पुढारी मामा परमानंद यांनी हे प्रकरण धसास लावले. त्यामुळे मोठीच खळबळ उडाली. 'इंदुप्रकाश' या पत्रामध्ये (24 फेब्रुवारी 1890) एक जाहिरात आली. तीत म्हटले, की केशवपनाची जबरदस्ती हिंदी दंड-संहितेच्या 352 कलमाप्रमाणे गुन्हा आहे. त्याप्रमाणे कोणी खटला केल्यास त्याचा योग्य खर्च देण्यात येईल. याबाबतीत 'सुबोधपत्रिका' किंवा 'इंदुप्रकाश' यांच्याकडे अर्ज पाठवावा. मामा परमानंदांनी या जाहिरातदारांचे अभिनंदन केले. या केशवपन विरोधी चळवळीमध्ये प्रत्यक्ष न्हावी समाजच पुढाकार घेऊ लागला. मुंबई येथे 14 एप्रिल 1890 रोजी न्हावी समाजाची विराट सभा भरली. सदोबा कृष्णाजी न्हावी गृहस्थ त्या सभेचे अध्यक्ष होते. या चळवळीची वार्ता इंग्लंडपर्यंत पोहोचली. लंडनमधील महिलांना हिंदू विधवांविषयी सहानुभूती वाटली. सुधारलेल्या इंग्रज

महिलांनी भारतीय महिलांना सहानुभूती दाखविली. जोतीरावांनी सतत चाळीस वर्षे मागासलेले वर्ग आणि स्त्रिया यांच्या हक्कांविषयी जिवापाड मेहनत घेतली होती.

जोतीरावांचा आजार अधिक विकोपास गेला. त्यांना समजून चुकले, की इहलोकीची यात्रा संपत आली आहे. सत्यशोधक समाजाच्या कार्यकर्त्यांना त्यांनी बोलावून घेतले. शांतपणे उपदेश केला. अनेकांना हुंदके आले. त्यांनी दु:ख आवरा म्हणून कळकळीने आदेश दिला. ''सावित्रीबाई आणि यशवंत यांना सांभाळा. हे माझे कार्य पुढे चालू ठेवतील,'' असे ते म्हणाले. लोखंडे समाचारास वारंवार येऊ लागले. भालेकर आले आणि त्यांनी प्रणाम केला. ससाणे, डॉ. लाड, रामय्या व्यंकय्या अय्यावारू आणि मोरो विठ्ठल वाळवेकर दर्शन घेऊन गेले. 'सार्वजनिक सत्यधर्म' पुस्तक लिहून झाले होते. परंतु छापण्याचा खर्च हा प्रश्न सुटला नव्हता. वाळवेकरांनी ते पुस्तक आम्ही छापू असे आश्वासन दिले. जोतीरावांच्या मनावरचे एक ओझे कमी झाले.

गुरुवार 27 नोव्हेंबर 1890 या दिवशी जोतीरावांची प्रकृती चिंताजनक होऊन त्यांचा अंत समीप आला आहे, असे दिसू लागले. आपल्या पत्नीस बोलावून तिला धीरगंभीरपणे आपला चिर-विरह सहन करावा, असे उपदेशिले. यशवंतास ईश्वराची प्रार्थना करावयास सांगितले. स्वत: मंद स्वरात प्रार्थना म्हटली. अखेरपर्यंत ते शुद्धीत होते. मुख प्रसन्न आणि प्रशांत होते. 28 नोव्हेंबर 1890 रोजी रात्री दोन वाजून वीस मिनिटांनी या नरश्रेष्ठाने इहलोकाची यात्रा संपविली.

जोतीरावांच्या मृत्यूची वार्ता सर्वत्र वाऱ्यासारखी पसरू लागली. पहाटेस त्या महात्म्याच्या दर्शनासाठी गर्दी वाढू लागली. पुण्याजवळील खेड्यातील सत्यशोधकांचे थवे शहराकडे लोटू लागले. त्यांच्या अंत्यदर्शनाकरिता फार मोठी गर्दी जमली. लोकांचा शोक अमर्याद झाला. सकाळी दहा वाजता जोतीरावांच्या देहाला स्नान घालण्यात आले. मग पोषाख चढविला गेला. पुष्पहारांच्या मोठ्या राशी त्यांच्या देहावर जमल्या. नातलग आणि सहकारी यांनी खांदा दिला. हिंदू, मुसलमान, ब्राह्मण, महार, मांग इत्यादी सर्वधर्मी लोक आणि स्त्रियाही सामील झाल्या. आपले प्रेत पुरावे, असे जोतीरावांनी आपल्या अखेरच्या इच्छापत्रात लिहिले होते; पण त्यांचे शव चितेवर गेले. जोतीरावांचे अनेक सहकारी खांदा द्यावयास आले होते. भाऊ कोंडाजी पाटील यांचे भावनोत्कट भाषण झाले. यशवंताने जोतीरावांच्या देहास अग्नी दिला. नंतर लोकसमुदाय माघारी फिरला. उभा महाराष्ट्र हळहळला. वृत्तपत्रांमध्ये जोतीरावांच्या जीवनाचे आणि ध्येयवादाचे उत्कटपणे, विविध शैलींमध्ये श्रद्धांजलीच्या रूपात वर्णन आले. कित्येकांनी ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाचे ज्वलंत पुरस्कर्ते म्हणून त्यांचा निर्देश आग्रहाने केला.

त्या काळाचे महान सुधारक मामा परमानंद हे जोतीरावांचे जिव्हाळ्याचे हितचिंतक व स्नेही होते. त्यांनी बडोद्याचे राजे सयाजीराव महाराज यांचे मन वळवून साध्वी सावित्रीबाई आणि दत्तकपुत्र यशवंतराव यांच्याकरिता मदत मिळविली. सयाजी



महाराजांनी 1892 च्या फेब्रुवारीत एक हजार रुपयांची हुंडी मामा परमानंदांकडे पाठविली. त्या रकमेतून प्रत्येक तिमाहीस पन्नास रुपये सावित्रीबाईंना मिळत. जोतीरावांच्या स्मारकासाठी मामा परमानंदांनी निधी गोळा केला. परंतु दु:खाची गोष्ट म्हणजे जोतीरावांचा दत्तक मुलगा यशवंत आणि सावित्रीबाई 1897 साली पुणे येथील प्लेगाच्या साथीत मृत्यू पावले.

## तेरा

# आता धार्मिक यादवी

जोतिबांच्या निधनानंतर महाराष्ट्रातील सत्यशोधक चळवळीचे रूपांतर ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादात झाले. त्यांना जोतीबांच्या बुद्धिवादाचा व विश्वमानवतावादाचा स्पर्श झालेला नव्हता. सत्यशोधक चळवळीचा विपर्यास म्हणजे ब्राह्मण-ब्राह्मणेतर चळवळ होय. भारतीय लोकशाहीच्या पन्नास वर्षांच्या अमदानीनंतर हा विपर्यास हळूहळू कमी होत आहे. परकीय आक्रमणापेक्षा आता धार्मिक यादवीचा अधिक धोका आहे. नकारात्मक आंदोलन कायम राखल्यास धार्मिक संघर्ष यादवी युद्धाचे तीव्र स्वरूप धारण करील.

जोतीबांनी सांगितलेले अर्धसत्य हिंदू-मुसलमान आणि हिंदू-शीख संघर्षामध्ये प्रभाव गाजवीत आहे. यामध्ये ब्राह्मणप्रधान जातिवाद जाऊन त्या ठिकाणी नवे धर्मवाद उभे रहात आहेत. जोतीबांनी सांगितलेले विचार जातिभेदातीत व धर्मभेदातीत होते. हे लक्षात घेतले तरच जोतीबांच्या सत्याचे संपूर्ण स्वरूप लक्षात आले असे होईल.

पृथ्वीवर देवाचे राज्य यावे याकरिता एखादा द्रष्टा एकदम प्रकट होतो व तो एका मंगल सत्याचे बीज देऊन जातो. त्या सत्याचे ते संपूर्ण बीज रोवले तर त्यातून देवाचे राज्य पृथ्वीवर निर्माण होऊ शकते. परंतु असे कधी झाले नाही. कारण अनुयायी त्या सत्याचा अर्धाच भाग स्वीकारतात व नरकाचा धोका निर्माण होतो. अंतर्गत यादवी हा सामाजिक नरक होय.

'गुलामगिरी' किंवा 'सार्वजनिक सत्यधर्म' या दोन पुस्तकातील जोतीराव फुले यांची भारताच्या राजकीय, धार्मिक व सामाजिक इतिहासाची उपपत्ती ही एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील युरोपीय व इंग्लिश इतिहासकारांनी लिहिलेल्या ग्रंथांच्या आधारे जोतीबांनी सांगितली आहे हे त्यांच्या 'शेतकऱ्याचा आसूड' या निबंधाच्या तळातील टिपण्यांवरून उघडकीस येते. इंग्रजी शिक्षण बेताबाताचे होते तरी ते इंग्लिश लिहू शकत होते व महत्त्वाचे उच्च दर्जाचे ग्रंथ समजून वाचू शकत होते ही गोष्टही यावरून निदर्शनास येते. अलीकडे गेल्या शंभर वर्षात प्राचीन भारतीय इतिहासाचे जे मौलिक संशोधन झाले आहे, त्या संशोधनाने पूर्वीच्या संशोधकांचे बरेचसे निर्णय काही बाबतीत चुकीचे ठरले आहेत व काही बाबतीत अंशतः काल्पनिक ठरले आहेत. मत्स्यावतारापासून परशुराम



अवतारापर्यंतच्या अवतारांचा जोतीरावांनी केलेला ऐतिहासिक अर्थ वामन व परशुराम वगळल्यास केवळ काल्पनिक आहे असे मानावे लागते. विशेषतः भारतीय विषम ब्राह्मणप्रधान समाजरचनेस बाहेरून आलेले ऋग्वेदिक आर्य हे मूलतःच कारण होत, या विधानाला आता विशेष पुष्टी मिळू शकत नाही. ऋग्वेदिक आर्य संख्येने अत्यल्प होते व कायम पगडा बसवतील इतके बलवानही नव्हते. विषम समाजरचनेची निर्मिती ही समाजाच्या आंतरिक सामाजिक शक्तींच्या आर्थिक व राजकीय बलामुळे निर्माण होते व ती परिवर्तन पावत असते हा सामाजिक विकासाचा सिद्धान्त मान्य करावा लागतो.

आर्यपूर्व अवैदिक भारत हा विकसित अशा द्रविडी संस्कृतीने व्यापला होता व वर्तमान हिंदू धर्म हा त्याच संस्कृतीचा परिवर्तित आविष्कार आहे, ही उपपत्ती आता सर्वमान्य झाली आहे. काही विद्यमान आधुनिक संस्कृतिशास्त्रज्ञ तर जातिभेद हा आर्यपूर्व संस्कृतीत भारताच्या दक्षिण प्रदेशाला वाढीस लागला व तो वैदिक आर्यांना स्वीकारावा लागला असेही म्हणू लागले आहेत. जोतीरावांनी 'गुलामगिरी' या पुस्तकात दाखवलेल्या आर्यपूर्व जोतीबा, खंडोबा, म्हसोबा, बहिरोबा, बाणासुर इ. देवता व त्याचे पूजा संप्रदाय हे आर्यपूर्व लोकांचे होते हे जोतीरावांनी स्वतःच सांगितले आहे. येथील द्राविडी संस्कृतीला आसुरी असे म्हणता येते. ही गोष्ट जोतीरावांनीही सुचविली आहे व त्यात बरेच तथ्य आहे. त्याच संस्कृतीतील मोठा व मूळचा पुरोहितवर्ग हाच विद्यमान भारतातील बहुसंख्य ब्राह्मणवर्ग, ही गोष्टही जोतीरावांना मान्य झाली असती असे 'सार्वजनिक सत्यधर्म' पुस्तकाच्या (पृ. 397) टिपणीवरून लक्षात येते. येथील देशस्थ ब्राह्मण हे शूद्र व अतिशूद्र यांच्यापैकीच आर्षीकरण झालेले ब्राह्मण होत, असे जे विधान त्यांनी केले आहे त्यावरून हे सूचित होते.

सोवळ्या-ओवळ्याच्या कल्पनेवर जोतीरावांनी कडाडून हल्ला केला आहे. सोवळ्या-ओवळ्याची ही कल्पना आर्यांनी वर्चस्व प्रस्थापित करण्याकरिता आर्येतरांवर लादली व ती त्यांनी भुलून पत्करली असे जे जोतीरावांनी जागोजागी विधान केले आहे, ते आधुनिक मानवजातिशास्त्रज्ञांना मान्य नाही. सोवळ्या-ओवळ्यांची कल्पना प्राथमिक मानवसमाजांमध्ये जगात सर्वत्र होती व वर्तमान कालापर्यंत कमीजास्त प्रमाणात अद्यावत किंवा आधुनिक पश्चिमी समाज सोडल्यास सर्वत्र कमीजास्त प्रमाणात आहे हे शास्त्रज्ञांच्या गेल्या दीडशे वर्षातील जागतिक संशोधनावरून सिद्ध होते. 'टाबू' (Taboo) आणि 'माना' (Mana) या मौलिक अशा मानवजातिशास्त्रज्ञांनी स्वीकारलेल्या कल्पना आहेत. त्या जादूटोणा व विविध धार्मिक विधी यांचा अर्थ उमगण्यास उपयोगी पडतात. प्राथमिक व मध्ययुगीन सर्व मानवसमाजांच्या धार्मिक चालीरीती, मंत्रतंत्र, जादूटोणा इत्यादी व्यवहारांचा 'टाबू' व 'माना' या कल्पनांच्या साहाय्याने मानवजाती शास्त्रज्ञांना अर्थ करता येतो. 'टाबू' म्हणजे निषिद्ध पापशक्ती व 'माना' म्हणजे विधायक पुण्यशक्ती होय. उदा० गोमांस भक्षण हे महापाप मानणे,

मृताच्या नातेवाइकांना अस्पृश्य मानणे म्हणजे सुतक पाळणे, प्रेताला अपवित्र मानणे, डुकरांचे मांस निषिद्ध मानणे इत्यादी प्रकारच्या निषेधात्मक चालीरीती आर्य व आर्येतर या सर्वांच्याचमध्ये पडतात. गोमांस भक्षण हे पाप आहे ही कल्पना मूळची आर्यांची नव्हे. ती आर्येतरांची आहे व ती कालांतराने आर्यांनी स्वीकारली ही कल्पना जोतीरावांनाही मान्य झाली असती. हे वैदिक आर्य गोमांसभक्षक होते असे त्यांनी वारंवार केलेल्या विधानांवरून स्पष्ट होते. मृतांच्या नातेवाइकांची अस्पृश्यता म्हणजे सुतक पाळण्याची चाल ही आर्येतरांपासून आर्यांनी स्वीकारली ही गोष्ट स्मृतींवरून अनुमानता येते. शूद्रांनी सुतक एक महिना पाळावे असे विधान स्मृतीत आढळते. स्मृतींमध्ये भक्ष्याभक्ष्यविषयक किंवा स्पृश्यास्पृश्याविषयक सांगितलेल्या चालीरीती या परंपरांगत असलेल्या त्या त्या जमातींच्या चालीरीती होत, नव्या कायद्याने निर्माण केलेल्या चालीरीती नव्हेत, ही गोष्ट स्मृतींच्या आधुनिक अभ्यासकांना नव्याने सांगण्याची गरज नाही.

बऱ्याचशा अनुयायांना व चाहत्यांना न मानवणारे असे अनेक विचार जोतीरावांनी मांडले आहेत. उदा० ज्ञानदेवांची 'ज्ञानेश्वरी' व अन्य संतप्रणित ग्रंथ शूद्र अतिशूद्रांना फसविण्याकरिता, ब्राह्मणांचे आधिपत्य दृढ करण्याकरिता निर्माण केलेले कारस्थान आहे असे जोतीराव अनेक ठिकाणी बजावतात. विष्णू व पंढरीचा विठ्ठल यांची जोतीरावांनी खूप थट्टा उडविली आहे हे महाराष्ट्रातील त्यांच्या चाहत्यांना व अनुयायांना कितपत पटले असेल याची शंका आहे. हिंदुधर्मातील मूर्तिपूजा हे ब्राह्मणांनी पोट भरण्याकरिता काढलेले थोतांड आहे; तीर्थयात्रा, श्राद्ध इत्यादी विधी हा लबाडपणाचा धंदा आहे; एकेश्वरवादी ख्रिस्ती धर्म व मुसलमान धर्म हे हिंदुधर्मापेक्षा अधिक श्रेष्ठ धर्म आहेत; इत्यादी जोतीरावांची विधाने चाहत्यांनी व अनुयायांनी विशेषकरून लक्षात घ्यावीत, अशी आहेत. महंमदावर एक उत्कृष्ट प्रशंसापर कविता जोतीरावांनी लिहिली आहे. ती या संदर्भात वाचावी. ख्रिस्ती व मुसलमान लोकांनी येथील हिंदूंना बाटविण्याचे पूर्वी केलेले प्रयत्न जोतीरावांस स्वागतार्ह वाटतात. त्याबद्दलची पोटदुखी केवळ ऐतखाऊ ब्राह्मणांनाच बाधते, असे त्यांनी वारंवार म्हटले आहे. उदा० पंडिता रमाबाई यांनी ख्रिस्ती धर्म पत्करून केलेल्या ख्रिस्ती धर्मप्रसाराची जोतीबांनी प्रशंसा केली आहे. (सत्सार : पृ.286). मात्र याचा अर्थ असा नव्हे की, हिंदूंनी मुसलमान वा ख्रिस्ती व्हावे असे जोतीरावांचे मत होते.

पवित्र ग्रंथनिष्ठ सर्वच धर्म हे मानवामानवात फूट पाडणारे असल्यामुळे अयोग्य होत, असा त्यांचा अंतिम निर्णय होता. तुलनात्मक दृष्टीने विचार करता, प्रचलित हिंदू धर्मापेक्षा मुसलमान वा ख्रिश्चन धर्म कैक पटीने श्रेष्ठ होत, एवढेच त्यांना सांगावयाचे होते. खरा धर्म सर्व मानवांचा एकच आहे. सर्व धर्मनिष्ठ सामाजिक भेद हे मिथ्या भेद होत, असा त्यांनी काढलेला अंतिम निष्कर्ष होता.



हिंदू धर्मावरील विशेषतः ब्राह्मणप्रधान हिंदू समाजरचनेवरील व ब्राह्मणप्रधान संस्कृतीवरील त्यांचा हल्ला एका तत्कालीन ऐतिहासिक विशिष्ट सामाजिक व राजकीय परिस्थितीची तीव्र प्रतिक्रिया होती व ती तीव्र प्रतिक्रिया तटस्थ रीतीने पाहणाऱ्या आधुनिक विचारवंतांस मर्यादित अर्थाने समर्थनीयच वाटेल यात शंका नाही व ती समर्थनीय आहेच. अव्यवस्थित व बेजबाबदार अशा उत्तर पेशवाईत व अव्वल इंग्रजीमध्ये ब्राह्मणांचे महाराष्ट्रात प्रस्थ वाढले व सामाजिक विषमतेची धार अधिक तीक्ष्ण झाली. ही गोष्ट लोकहितवादी, न्या. रानडे, आगरकर, इत्यादी आधुनिक विचारवंतांना देखील खंत व उद्वेग उत्पन्न करणारी बाब वाटत होती, ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. उत्तर पेशवाई बेजबाबदार व हीन दर्जाची होती असेच लोकमान्य टिळकांचे मत होते.

लोकहितवादींची 'शतपत्रे' ही या गोष्टीची साक्ष देतात. ही शतपत्रे म्हणजे ब्राह्मणी विद्यांवर व ब्राह्मणी संस्कृतीवर उगारलेली बुद्धिवादी शतशस्त्रेच होत. ती अजूनपर्यंत गंजलेली नाहीत, त्यांचे तेज अजूनही तळपत आहे. वर्तमान परंपरावादी विद्यापीठीय अनेक सुशिक्षितांना—विशेषतः मराठी प्राध्यापकांना—त्यांच्यापासून इशारा अजूनही लक्षात आलेला नाही. परंतु आता स्वातंत्र्योत्तर काळात ब्राह्मणेतर वाद हा जीर्ण झाला असून त्यातील अभिनिवेश कमी झाला आहे. ब्राह्मणेतरांच्या हातात लोकशाहीने कठोर संघर्षाशिवाय सत्तांतर केले आहे.

भारताचे यांत्रिकीकरण त्वरित होत आहे. सर्व जाती, जमाती व धर्म यांची एक बाजारपेठ होत आहे. शिक्षणात त्या सर्वांना दरवाजे खुले होत आहेत. नोकऱ्यात पारंपरिक अस्पृश्य व तत्सम जमातींना सवलती आहेत. अप्रगत जमातींना सरकारी नोकऱ्यांमध्ये जास्त वाव मिळावा यासाठी चळवळी चालू आहेत. लोकशाहीमुळे हिंदूंमधील यादवीचा धोका फार कमी झाला आहे. पण याच सुमारास भारतातील मुसलमान, शीख व हिंदू यांच्यातले संघर्ष जोरदार वाढत आहेत. हिंदू व शिखांमध्ये यादवी आली आहे. हिंदू-मुसलमानांमधली यादवी आता दूर नाही.

हिंदू व शीख आणि हिंदू व मुसलमान यांच्या दहशती संघर्षातून भारतीय प्रजासत्ताकाच्या ऐक्याला व स्थैर्याला धोका आला आहे. जोतीरावांचे तत्त्वज्ञान या धोक्यातून आपल्याला बाहेर काढण्यास समर्थ आहे. जोतीरावांचा निर्मिक ईश्वर या संघर्षाची आच कमी करू शकतो. जोतिरावांचा सत्यवर्तन हाच धर्म हा संदेश बहुसंख्य हिंदूंना विचारप्रवर्तक करून हा संघर्ष विझवू शकतो. आगामी धार्मिक यादवी अटळ नाही. सत्यशोधक महात्मा जोतीबा फुले महाराष्ट्राप्रमाणेच सबंध भारताला कामयची मार्गदर्शक मशाल आहे.

---

टीप : धनंजय कीर व सं. ग. मालशे : महात्मा फुले-समग्र वाङ्मय, (महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ प्रकाशित, 1969) या ग्रंथातील प्रस्तावनेवर आधारीत हे प्रकरण लिहिले आहे.

# उपसंहार

जोतीराव फुले हे भारतातील आधुनिक समताप्रधान समाजनिर्मितीच्या ध्येयवादाचे प्रवक्ते होते. गरीबांचे प्रश्न त्यांनी मोठ्या कळकळीने समाजापुढे मांडले. सामान्य जनतेची सामाजिक गुलामगिरी नष्ट करून, सामाजिक न्याय मिळवून देण्याकरिता त्यांनी चळवळ सुरू केली. मानवी प्रतिष्ठा आणि मानवी स्वातंत्र्य हे सगळ्या भारतीयांना जात आणि धर्म विसरून भोगता आले पाहिजे, हे उद्दिष्ट धरून ही चळवळ सुरू झाली. ती अजून पूर्ण सफल झाली नाही. परंपरावाद आणि सनातनी प्रतिगामी धोरण यांवर त्यांचा हल्ला होता. एकाच कुटुंबात हिंदुधर्मी, मुसलमान, ख्रिश्चन, ज्यू आणि निधर्मी निकटचे नातेवाईक सौख्याने नांदावे असे, ते आग्रहाने प्रतिपादित. त्याकरिता ते झुंज देत होते. कोणतीही सामाजिक मूलगामी परिवर्तनाची चळवळ समतावादाच्या कल्पनेने झपाटलेली असावी लागते. आपल्या ध्येयपूर्तीसाठी जोतीरावांनी सारी सुखे आणि मानाची स्थाने नाकारली. नवी जडणघडण करू पाहणारे, नवसमाज निर्माणकर्ते जोतीरावांसारखे महापुरुष भारताला मिळाले. त्यांची परंपरा चालवणारे नवेनवे नेते उदयाला आले. त्यामुळे जोतीरावांसारख्या महापुरुषांच्या कार्यावर विस्मृतीचा पडदा पडला नाही. जोतीराव हे अग्रदूत होते. जोतीरावांच्या जीवनातील विशेष गोष्ट म्हणजे त्यांची पत्नी सावित्रीबाई ही त्यांच्या कार्यात सहभागी राहिली. सामाजिक समता, बुद्धिप्रामाण्यवाद आणि मानवी एकता या आधुनिक विश्वमानवी समाजाला एकरूपता देणाऱ्या मूल्यांचा महामेरू जोतीराव फुले होते.

# भाग दुसरा

महात्मा जोतीराव फुले यांच्याविषयी आतापर्यंत जेवढे लेखन झालेले आहे, त्या सर्व लेखनात तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी लिहिलेल्या 'जोतिनिबंध' या निबंधास अत्यंत महत्त्वाचे स्थान आहे. हे लहानसे पुस्तक 1947 रोजी साली प्रसिद्ध झाले. वाईच्या प्राज्ञ पाठशाळेने ते छापले होते. या पुस्तकाचाही अंतर्भाव येथे केला आहे.

—प्रकाशक

# जोतिनिबंध

*हिंदुस्थानातील सामाजिक गुलामगिरीच्या विरुद्ध बंड पुकारणारा पहिला पुरुष*

***जोतिबा फुले.***

इंग्रजी राज्याच्या स्थापनेबरोबर हिंदुस्थानात पाश्चात्य संस्कृतीच्या व पाश्चात्य सुधारणेच्या संगमास प्रारंभ झाला. पाश्चात्यांचा संबंध हिंदुस्थानशी इंग्रजी राज्याच्या स्थापनेपूर्वी कित्येक शतके आला होता. परंतु तेव्हा ही गोष्ट घडू शकली नाही. इंग्रजी राज्याच्या स्थापनेपूर्वी पाश्चात्य लोक व्यापाराचे निमित्ताने हिंदुस्थानात अनेक शतके आले होते. त्यांचे व्यापारी दळणवळण सारखे वाढत होते. पोर्तुगीज, डच, फ्रेंच व इंग्लिश यांचे व्यापारी व राजकीय संबंध त्या वेळीच पक्के झाले होते. पोर्तुगीजांचा अंमल पश्चिम किनाऱ्यावर तीनशे वर्षे गाजत होता. इतके होऊनही पाश्चात्य संस्कृतीच्या व सुधारणेच्या महान प्रकाशाने भारतीय लोक जागृत झाले नाहीत. ही गोष्ट केवळ इंग्रजी राज्याच्या स्थापनेमुळेच शक्य झाली.

इंग्रजी राज्याने पाश्चात्य सुधारणांचा पाया तयार केला. पाश्चात्य सुधारणेचा खोल परिणाम होऊन येथील बुद्धिमंताचे ठिकाणी जबरदस्त प्रतिक्रिया उत्पन्न झाली. ती इतकी झाली की, ती प्रतिक्रिया आजतागायत सारखी टिकून राहिली आहे आणि विकासही पावत आहे. ही प्रतिक्रिया दोन तऱ्हेने घडून आली. एक अनुकूल व दुसरी प्रतिकूल. अनुकूल प्रतिक्रियेमुळे अंतर्मुख वृत्ती उत्पन्न झाली आणि त्यातून बुद्धिवाद, शास्त्रीय चिकित्सा, इतिहाससंशोधन, सुधारणांची आकांक्षा आणि सांस्कृतिक व सामाजिक पुनर्विधानाची तृष्णा निर्माण झाली. परंपरेच्या विरुद्ध टीका करण्याची प्रवृत्ती सुधारणेच्या वाढत्या आशेमुळे वाढीस लागली. अनेक मोठमोठे थोर सुधारक हिंदुस्थानच्या इतिहासाला नवीन गती देण्याच्या महत्त्वाकांक्षेने प्रेरित झाले. वस्तुतः गेल्या दोन हजार वर्षाचा इतिहास त्यांच्याविरुद्ध होता. दीर्घकाळाच्या अंधश्रद्धेने जड व अगतिक झालेली समाजरचना त्यांना पदोपदी अडथळा करीत होती. सामाजिक संस्था दृढमूल झालेल्या सनातन चालीरीती आणि पुराणमताभिमानी लोक पर्वतप्राय अडचणीच

निर्माण करीत होते. भूत व वर्तमानकाळ जरी दुर्दशेने ग्रस्त होता तरी तो त्यांचा वैरीच होता. अशा स्थितीत समुद्रापलीकडून आलेले नवे जगच फक्त त्यांना अभयतेचे आश्वासन देत होते.

पाश्चात्य सुधारणेच्या सर्वस्वी विरुद्ध अशी एक दुसरी प्रतिक्रिया येथील शिकलेल्या लोकांच्या ठिकाणी त्याच वेळी उत्पन्न झाली. अर्थात ही प्रतिक्रिया सुधारणेच्या विरोधी जशी होती तशी ती इंग्रजी राज्याच्याही विरोधी होती. पाश्चात्य सुधारणेच्या विशाल वैभवाचा मत्सर आणि हजारो वर्षे श्रद्धेने पूजिलेल्या प्रिय व पवित्र अशी ईश्वरदत्त पुराण संस्कृतीच्या विनाशाची भीती या दोन भावना प्रतिक्रियेच्या मुळाशी होत्या. पाश्चात्य सुधारणा असे उघड रीतीने सूचित करीत होती की, तुमची दिव्य ज्ञानाची भांडारे म्हणून जी प्रसिद्ध आहेत त्यात ज्ञान असे अल्प असून भ्रम, निराधार कल्पना, दंतकथा व विशिष्ट देशकालाच्या मर्यादेतच महत्त्व असलेली मूल्ये अधिक साठलेली आहेत. तुमची समाजरचना इतकी जुनी व जीर्ण झाली आहे की, तिच्यात आमूलाग्र बदल केल्याशिवाय तुम्हांस प्रगतीच्या पथावर पाऊल पुढे टाकता येणार नाही. आजपर्यंत तुमच्या समाजात ज्या साधनांनी माणसे (जाती व वर्ण) उच्च स्थानावर चढली ती साधने टिकाऊ नाहीत. एवढेच नव्हे, तर ती अयोग्य आहेत. तुमचा मोठेपणा बऱ्याच बाबतीत बेगडी आहे. सुधारणेचा हा आवाज ऐकून ज्यांनी आत्मसंशोधन सुरू केले आणि नवसुधारणेस अर्थपूर्ण महत्त्व दिले त्यांचा धि:क्कार वर सांगितलेल्या प्रतिकूल प्रतिक्रियेमुळे होऊ लागला. सुधारक लोक पाश्चात्य सुधारणेच्या बाह्य देखाव्याने दिपले आहेत असे त्यांस सनातनमतवादी लोक हिणवू लागले. इंग्रजी राज्यामुळे पाश्चात्य सुधारणा येथे दृढमूल होणार अशी साधार भीती उत्पन्न झाल्यामुळे त्या राज्याच्या विरुद्ध असंतोषाची आणि बंडाच्या प्रवृत्तीची बीजे या प्रतिक्रियेने खोल रुजली. पूर्वपरंपरेचे अवास्तव समर्थन करणारी विचारपद्धती लोकप्रिय होऊ लागली. इतिहास, धर्म, चालीरीती, जातिभेद, मूर्तिपूजा इत्यादी सर्व परंपरेची आणि परंपरागत मूल्यांची दोषस्थाने झाकून मिथ्या समर्थन करणारे लोकाग्रणी बनू लागले. या प्रतिक्रियेचे मुख्य वैशिष्ट्य हे की, ही प्रतिक्रिया परंपरा, संस्कार, इतिहास यांच्याशी संवादी होती. त्यामुळेच सुधारणावाद व बुद्धिवाद यांना पराभूत करण्याची ताकद तिच्या ठायी जबरदस्त होती.

या दोन प्रतिक्रियांचा झगडा म्हणजेच इंग्रजी राजवटीतील हिंदी समाजाचा इतिहास होय. हा झगडा समाजकारण, राजकारण, धर्म आणि वाङ्मय या सगळ्या क्षेत्रात प्रकट झालेला दिसतो. हा झगडा कित्येक वेळा अत्यंत स्पष्ट व निर्मळ स्वरूपाचा दिसतो तर कित्येक वेळा संकुल, संमिश्र किंवा अस्पष्ट स्वरूपाचा दिसतो. जीवनाकडे पाहाण्याचे दोन विरुद्ध दृष्टिकोन या झगड्यात उत्पन्न झाले. प्रतिगामी प्रतिक्रियेने पुराणमताभिमानी राष्ट्रवादाला जन्म दिला आणि पाश्चात्य सुधारणेचे स्वागत करणाऱ्या प्रतिक्रियेने बुद्धिवादी मानव्यवादाच्या उदयाला अनुकूल परिस्थिती निर्माण केली. प्रतिगामी



प्रतिक्रियेने गतेतिहासांचे व भूतकालाचे शोचनीयत्व दडविले आणि अधोगतीला नेणाऱ्या शक्तीचे समर्थन केले. सुधारणाप्रिय प्रतिक्रियेने भूतकालाचा व इतिहासाचा वास्तविक अर्थ दाखवून दिला आणि प्रगतीचे रहस्य समजावून सांगितले.

सर्व हिंदुस्थानावर या दोन प्रतिक्रिया प्रथम उत्पन्न झाल्या नाहीत. प्रथम बंगाल व महाराष्ट्र यातच या स्पष्ट रूपाने उदयास आल्या. पाश्चात्य सुधारणेचे स्वागत करणाऱ्या प्रवृत्तीचे तीन प्रवाह झाले. हे तीन प्रवाह महाराष्ट्रात विलग स्वरूपात प्रभावीपणे वाहात असलेले दिसतात. पहिला प्रवाह धार्मिक सुधारकांचा. ब्राह्मसमाज व प्रार्थनासमाज यांच्यामध्ये हा पहिला प्रवाह व्यक्त स्वरूपात आला. न्या. म. गो. रानडे, डॉ. भांडारकर, मोडक, श्री. विठ्ठलराव शिंदे, न्या. म. चंदावरकर इत्यादी मंडळी या विचारप्रणालीची महाराष्ट्रातील अग्रणी होत. दुसरा प्रवाह बुद्धिवादी ब्राह्मण सुधारकांचा. हे लोक अस्सल जडवादी किंवा अज्ञेयवादी होत. प्रिन्सिपॉल आगरकर हे त्यांचे अग्रणी. तिसरा मोठा प्रवाह ब्राह्मणी संस्कृतीच्या विरुद्ध बंड करणाऱ्या ब्राह्मणेतरांच्या चळवळीचा. ह्या प्रवाहाचे आद्य जनक जोतिराव फुले हे होत. या तिन्ही सुधारणाप्रवाहांचे सर्वसंमत साधारण वैशिष्ट्य थोडक्यात असे सांगता येईल :

1. पाश्चात्य विज्ञान हे संपूर्ण स्वागतार्ह आहे.
2. धर्माशी प्रत्यक्ष संबंध नसलेले आधुनिक शिक्षण हाच खरा पाया आहे.
3. जातिभेद ही संस्था व्यक्तिविकासाचे महान बंधन असल्यामुळे समूळ नष्ट व्हावयास पाहिजे.
4. चातुर्वर्ण्याचे तत्त्वज्ञान समाजविकासास प्रतिबंध करणारे आहे.
5. व्यक्तिस्वातंत्र्याच्या पायावर लोकसत्तात्मक राज्यव्यवस्था हिंदुस्थानात निर्माण होण्याची गरज असल्यामुळे तत्पूर्वी सामाजिक परिवर्तनाची आवश्यकता आहे.
6. या सामाजिक परिवर्तनास कुटुंबसंस्थेत व विवाहसंस्थेत बदल करण्यापासून खरा प्रारंभ होतो आणि त्याकरिता स्त्री-शिक्षण आणि स्त्री-स्वातंत्र्य यांचा पुरस्कार पहिल्यांदा केला पाहिजे.

वरील साम्य सुधारणेच्या तिन्ही चळवळीत दिसून येते. परंतु महाराष्ट्रातील ब्राह्मणेतर सुधारक यांच्यामध्ये मुख्य तफावत अशी होती की, ब्राह्मणेतर सुधारकांचे प्रश्न मागासलेल्या बहुसंख्य जनतेच्या जीवनाशी निगडित होते, तर ब्राह्मण सुधारकांचे प्रश्न पांढरपेशा उच्चवर्णीयांच्या जीवनाशी संबद्ध होते. ब्राह्मणेतरांच्या विचारसरणीतून हिंदू धर्माच्या पूर्वपरंपरेवर मूलोच्छेदी प्रहार करण्याची तीव्र आणि कठोर प्रवृत्ती निर्माण झाली. ती इतक्या तीव्र व कठोर स्वरूपात ब्राह्मण सुधारकांच्या विचारसरणीतून उद्भवू शकली नाही. या उच्छेदक प्रवृत्तीला जी अनेक महत्त्वाची कारणे झाली त्यात अत्यंत महत्त्वाचे कारण म्हणजे इंग्रजी राज्यस्थापनेच्या पूर्वीच्या महाराष्ट्रातील देशी राज्याच्या

आमदानीचे उत्तरार्ध हे होय. त्या राज्यातील जातिभेदाची तीव्र अंमलबजावणी, ब्राह्मणेतर जातींना दडपण्याची राज्यकर्त्यांची सवय, कायद्याच्या अंमलबजावणीतील पक्षपात, लाचलुचपत आणि सर्वसाधारण बेबंदशाही यांचा खोल परिणाम ब्राह्मणेतर चळवळीच्या मुळाशी दिसून येतो. ब्राह्मणप्रणित धर्मग्रंथ, त्यावर आधारलेली हिंदूंची समाजरचना व त्या समाजरचनेस पोषक असलेली धार्मिक परंपरा या सर्वांच्या विरोधाने भारलेल्या त्वेषाने ही चळवळ उभारली गेली.

ब्राह्मण सुधारकांच्या सुधारणेचा पल्ला पांढरपेशा समाजाच्या मर्यादेबाहेर पोहोचला नाही. ब्राह्मणांचे व पांढरपेशांचे आचार व चालीरीती नव्या इंग्रजी राज्यातील नव्या व्यवसायास आणि पेशास जुळणारे नव्हते. यांत्रिक व औद्योगिक परिवर्तनाशी ते जमणारे नव्हते. म्हणून त्यात बदल करण्याच्या मुद्द्याला सुधारकांनी फार उचलून धरले. सोवळे-ओवळे, खाण्यापिण्याचे निर्बंध, पोषाखाची पद्धती, श्राद्ध, सुतक, मूर्तिपूजा इत्यादी सामाजिक धार्मिक चालीरीतीतील बदल करणे जरुरीचे वाटू लागले. इंग्रजी नोकरीत आणि शहरी व्यवसायात यांची लुडबूड वाटू लागली. एकत्र कुटुंबसंस्थेत मौलिक परिवर्तन करण्याच्या कल्पनेला केंद्रस्थान सुधारकांच्या चळवळीत प्राप्त झाले. सुधारकांची सर्व चळवळ एकत्र कुटुंबसंस्थेच्या परिवर्तनाभोवती केंद्रित झाली. वाहतुकीच्या नवीन साधनांनी आणि इंग्रजी राज्यातील नोकऱ्या व व्यापारी व्यवहार यांनी एकत्र कुटुंबसंस्थेत विस्कळीतपणा निर्माण केला. आपल्या स्वतःच्या पिढ्यान् पिढ्या एकत्र राहिलेल्या कुटुंबातून निघून दूरच्या जिल्ह्यात, शहरात किंवा प्रांतात पांढरपेशे लोक जाऊ लागले. खेड्यातील शेतीचा, सावकारीचा, भिक्षुकीचा किंवा इतर प्रकारचा व्यवसाय या नव्या परिस्थितीत एकत्र कुटुंब-संस्थेच्या परिवाराला अपुरा पडू लागला म्हणून वकील, सरकारी नोकर, डॉक्टर, शिक्षक इत्यादी नात्यांनी कुटुंबातील माणसे एकमेकांपासून दूर होऊ लागली. खेड्यातील जुनाट परिस्थितीचा या दूर गेलेल्या माणसांच्या मनावर पूर्वीसारखा दाब राहिला नाही. त्यामुळे नवे प्रश्न उत्पन्न झालेले दिसू लागले. मुलांना मोठ्या वयापर्यंत शिक्षण द्यावे लागल्यामुळे त्यांचा लग्नाचा काळ लांबू लागला. बालविवाहाची जुनी प्रथा या नव्या परिस्थितीत अर्थातच अडचण उत्पन्न करू लागली. आणखी असे की, कुटुंबसंस्थेतून दूर गेलेल्या नवशिक्षित तरुणाला एकत्र कुटुंबसंस्थेच्या छायेच्या अभावी बावळट दिसणाऱ्या अशिक्षित स्त्रीचे आकर्षण वाटेनासे झाले. पाश्चात्य देशातील शिक्षित स्त्रियांचे आदर्श त्यांना मोहक वाटू लागले. म्हणून स्त्रीशिक्षणाच्या प्रश्नाचे महत्त्व वाटू लागले. त्याबरोबरच बालविवाहाचा प्रश्न जाचावयास लागला. स्त्रीजीवनविषयक पुराणातील आदर्शच दृष्टीसमोरून लुप्त झाला आणि स्त्रीविषयी अत्यंत क्रांतिकारक मूल्याचा प्रवेश या वेळी झाला. स्त्रीचे वैयक्तिक स्वातंत्र्य ही कल्पना वैयक्तिकदृष्ट्या श्रेष्ठ ठरू लागली. भारतीय संस्कृतीच्या परंपरेत पुरुषपराधीनता हा स्त्रियांचा आदर्श मानला आहे. सतीची चाल, आमरण वैधव्यव्रत, विधवावपन, बालविवाह, लग्नविच्छेदबंदी, संपत्तीच्या वारसाहक्काचा अभाव, पडद्याची चाल, तोंडावरील घुंगट, परपुरुषाशी संभाषण करण्यास प्रतिबंध इत्यादी स्त्रियांची दास्यचिन्हे नष्ट करण्याची चळवळ सुधारकांनी हाती घेऊन भारतीय संस्कृतीला कौटुंबिक तत्त्वज्ञानाचा उच्छेद आरंभिला. स्त्रीशिक्षण हा त्याचा विधायक पाया होय. एकत्र कुटुंबसंस्थेचा आधार व अंगभूत असलेल्या चालीत आणि कायद्यात परिवर्तन करण्याची चळवळ ब्राह्मण सुधारकांनी हाती घेतली हे त्यांचे मुख्य वैशिष्ट्य होय.



जुन्या चाली, जातिभेद, अस्पृश्यता, वारसाहक्काचा कायदा इत्यादिकांचा आधार हिंदू धर्म होय. सर्व जुन्या परंपरेचे तत्त्वज्ञानात्मक समर्थन हिंदू धर्म करतो. रूढीच्या सामर्थ्याचे मानसिक उगमस्थान हिंदू धर्म होय. हिंदू धर्मातच सुधारणा केल्याशिवाय सामाजिक सुधारणा करणे अशक्य आहे ही गोष्ट ज्या आधुनिक विद्यावंतांच्या निदर्शनास आली त्यांनी धार्मिक सुधारणेचा प्रयत्न केला. बंगाल्यात ब्राह्मसमाज आणि महाराष्ट्रात त्याचीच एक शाखा प्रार्थनासमाज त्यांनी स्थापन केला. त्यांनी जुन्या सर्व धर्मसंस्थांचा संकुचितपणा ओळखला आणि सर्व जुन्या धर्मातील मूलभूत तत्त्वे शोधून धार्मिक आग्रहीपणाला आळा घालण्याचा प्रयत्न केला. त्यांनी असे पाहिले की, एकोणिसाव्या शतकातील मानवसंस्कृती अशा एका उच्च पातळीवर पोहोचली आहे की, तेथे धर्मभेद, राष्ट्रभेद, खंडभेद यांच्या मर्यादा निरर्थक ठरत आहेत. सदसद्विवेकबुद्धी हीच यापुढे धर्माचे प्रमाण मानणे भाग होय. विशिष्ट धर्मग्रंथ, विशिष्ट प्रेषित, विशिष्ट धर्मसंस्थापक ह्यांना एकांतिक प्रामाण्य देणे अयोग्य आहे असे त्यांना दिसले, म्हणून विवेकबुद्धीवर आधारलेला नवा धर्म निर्माण करून पाश्चात्य सुधारणेचे स्वागत करण्यास अनुकूल अशी मनोभूमिका निर्माण करण्याचा त्यांनी प्रयत्न केला.

ब्राह्मणेतर चळवळीची स्थापना करणारे जोतिबा फुले यांच्याभोवती नवशिक्षित सुधारकांच्या चळवळीचे बीजारोपण सुरू होते. त्याचबरोबर त्यांना पुणे शहरातील व मुंबईतील युरोपीय विद्वान व ख्रिश्चन मिशनरी यांचाही सहवास घडला व त्यापासून त्यांच्या विचारांना चांगलीच सामग्री लाभली. महाराष्ट्रात जेव्हा इंग्रजी राज्याची स्थापना झाली व पेशवाईचा अंत झाला त्यानंतर पहिल्या दहा वर्षातच जोतिबा फुले ह्यांचा जन्म झाला. पुणे शहराच्या आसपास यांचा जन्म झाला. त्यामुळे तेथील पाश्चात्य सुधारणांचा परिणाम त्यांच्यावर झाल्याशिवाय राहिला नाही. शिक्षणाच्या दृष्टीने मागासलेल्या अशा माळी जातीत त्यांचा जन्म झाल्यामुळे त्यांच्या शिक्षणात पुष्कळच अडचणी आल्या. परंतु परिणामक्षम सूक्ष्म मन असल्यामुळे आणि बुद्धी विचारशील आणि चौकस असल्यामुळे बदललेल्या परिस्थितीचा अर्थ अत्यंत व्यापकपणे जोतिबांना समजल्याशिवाय राहिला नाही. इंग्रजी राज्याच्या आगमनाने झालेल्या क्रांतीचा अर्थ त्यांना जितका त्यांच्या काळात समजला तितका फारच थोड्यांना समजला होता. स्वतःच्या परिस्थितीचा अर्थ समजणारे आत्मप्रयत्नशील लोकच स्वतंत्र होऊ शकतात

आणि आत्मोन्नती करू शकतात. त्यांच्यातच गुणांचा विकास होतो आणि कर्तृत्व विकास पावते. ज्या लोकांना स्वतःचे समाजातील स्थान काय आहे हे कळत नाही असे आत्मप्रतीतिशून्य मानव हे समाजात दासच राहतात. सांस्कृतिकदृष्ट्या ते हीन स्थितीतच सरपटत राहतात. हिंदू समाजातील बहुजन समाजात आत्मप्रत्यय व आत्मावलोकन उत्पन्न करणारा पहिला माणूस म्हणजे जोतिबा फुले होय. हिंदी बहुजन समाजाच्या सामाजिक गुलामगिरीचा प्रथम प्रत्यय किंवा पहिली ओळख झालेला बहुजन समाजातला पहिला माणूस जोतिबा फुले हा होय. ज्यांना स्वतःची गुलामगिरी समजत नाही ते गुलामगिरीतून कधीही मुक्त होत नसतात. शतकानुशतके अज्ञानाने, दारिद्र्याने व हीन संस्कृतीने ग्रासलेल्या हिंदू समाजातील जनतेला आत्मपरिक्षण करण्याचा पहिला आदेश जोतिबांमुळे मिळाला. महाराष्ट्रातच असा माणूस का उत्पन्न झाला याला ऐतिहासिक कारणे जबाबदार आहेत. देवाविरुद्ध, धर्माविरुद्ध, तीर्थस्थानांच्या विरुद्ध, धर्मगुरूंच्या विरुद्ध, धर्मग्रंथाच्या विरुद्ध आणि सर्व पवित्र वंद्य परंपरेच्या विरुद्ध बंड करणारा, बंडाचा उठाव करणारा असा माणूस पहिल्यांदा महाराष्ट्रातच का उत्पन्न झाला या प्रश्नाला ऐतिहासिक पार्श्वभूमीचे संशोधन केल्यास योग्य उत्तर मिळते.

ही ऐतिहासिक पार्श्वभूमी स्वतः जोतिबा फुले ह्यांनीच सांगितली आहे. ब्राह्मणी वर्चस्व, जातिभेदातील उच्चनीचतेचा कठोर अंमल, धर्मसंस्थेच्या छत्राखाली अज्ञान व भोळेपणा यांनी भरलेल्या कल्पनांचे प्रस्थ, अंधश्रद्धेने पाठिंबा दिलेल्या मौर्ख्यपूर्ण चालीरीती इत्यादी हिंदू समाजातील सामाजिक दोष त्या ऐतिहासिक पार्श्वभूमीत आहेतच; परंतु या गोष्टी आजपर्यंत हिंदू समाजात तशाच कायम आहेत. ऐतिहासिक पार्श्वभूमीचा विशिष्ट संबंध अवनत झालेल्या मराठी राज्याच्या उत्तरार्धाशी पोहोचतो. या उत्तरार्धात ब्राह्मण पेशव्यांच्या हातात मराठी राज्याची सगळी सूत्रे आली होती. या वेळी त्या राज्यपद्धतीत असलेली अवनतीची बीजे फोफावली.[1] हिंदू समाजरचनेचे अंगभूत व भाविक असलेले दोष अधिक उग्र व घृणित रूपात प्रकट झाले. कायद्याचे स्वरूप अगोदरच अस्पष्ट, ओबडधोबड व अशास्त्रीय होते. त्याच्या अंमलबजावणीची पद्धत मागासलेली होती. सारावसुली, कर्जवसुली व मजुरीची पद्धत तर शेतकऱ्यास, ऋणकोस व मजुरास फारच जाचक स्वरूपाची होती. त्यात गोंधळही फार होता. या संबंधी जोतिबा फुलेंनी 'इषारा' या त्यांच्या निबंधात मार्मिक चित्र रेखाटले आहे. ते म्हणतात, ''थोडकेच दिवसांमागे पेशवे यांचे शेवटील कुलदीपक पुरुष रावजी यांचे कारकीर्दीचा अस्त होईपर्यंत शेतकरी शेतसारा देण्यास थोडेसे चुकले तर त्यास उन्हामध्ये ओणवे करून पाठीवर एक मोठा दगड किंवा त्याची बायको पाठीवर बसवीत आणि खालून मिरच्यांचा धूर देत असत. ते प्रजा म्हणजे एक प्रकारची जनावरेच समजत. त्यांचा उपयोग म्हटला म्हणजे त्यांनी राजाकरिता व त्यांचे जातींचे लोकाकरिता, त्यांच्या स्त्रियांकरिता व मुलांबाळांकरिता धान्य उत्पन्न करावे, वस्त्रे विणावीत, उन्हातान्हात खपावे, ऐषारामाच्या सर्व गोष्टी पुरवाव्यात. आता हे (इंग्रजी) राज्य आल्यामुळे प्रजेस पूर्वीच्या राज्यात द्वेषामुळे नीतीसंबंधी, राज्यसंबंधी आणि अनेक गोष्टींसंबंधी जुलूम होत असत त्या सर्वातून ती एकदाची सुटली.'' महाराष्ट्रात पावसावरच बरीचशी शेती त्या वेळी अवलंबून होती. त्यामुळे मधूनमधून पावसाने धोका दिल्यामुळे शेतकऱ्यास कर्ज फेडणे कठीण जात असे. ती स्थिती अजून कायम आहे. परंतु त्या वेळी सरकार सावकारांच्या बाजूचे सर्वस्वी होते. त्यामुळे ऋणकोची दैना फार होत असे. सर्वस्व गमावण्याची पाळी त्याच्यावर फार वेळा येत असे. यासंबंधी जोतिबा म्हणतात. ''त्यावेळेस सरकारात फिर्याद वगैरे लागत नसे. कारण त्यांचे (सावकारांचे) दारातच सरकार होते. मनास वाटेल त्याप्रमाणे कुळास मारावे, झोडावे, त्याचा सर्व माल हिसकावून घेऊन जावा, त्याची बैलढोरे विकावी, त्याचे मुलांमाणसांचे हाल हाल करावे, शरीराचे नाजूक भागास चाप लावावेत, कोलदांडा घालून मार द्यावा, सातआठ रुपयांचे रकमेकरिता शेत जाई, गुरेढोरे जाई, विहीर व मळे जाई, आणि सरतेशेवटी तोही देशोधडीस जाण्यास अथवा प्राणत्याग करण्यास सिद्ध होई.''



त्या देशी राज्यात जातिभेदाला अधिक तीव्र स्वरूप प्राप्त झाले होते. ब्राह्मणांचा अहंकार व दांभिकपणा पराकाष्ठेला पोहोचला होता. यासंबंधी अनेक उदाहरणे दिली आहेत व त्यात फार मोठा सत्यांश आहे. उदाहरणार्थ, जोतिबा म्हणतात, ''कोणी शूद्र नदीकाठावर आपली वस्त्रे धूत असता तेथे एखादा भट आला तर शूद्रास (ब्राह्मणेतरास) आपली सर्व वस्त्रे गोळा करून भटाच्या अंगावर शिंतोडे येण्याचा संभव नाही अशा स्थळी जाऊन ती वस्त्रे धुवावी लागत असत. तेथून जर भटाच्या अंगावर पाण्याचा शिंतोडा आला तर त्या भटाने रागाने अग्नीसारखे तप्त होऊन जवळचे भांडे त्याचे मस्तक रोखून मोठ्या त्वेषाने मारावे. त्यामुळे मस्तक रक्तबंबाळ होऊन मूर्च्छा येऊन जमिनीवर त्याने धाडकन पडावे. शुद्धीवर आल्यावर आपली रक्तांनी भरलेली वस्त्रे घेऊन निमूटपणे घरी जावे. सरकारात कळवावे तर भटशाही पडली. उलट कळविणारासच सजा व्हावयाची.'' अस्पृश्यांचे हाल तर कल्पना करविणार नाही इतके होत. ब्राह्मणावर आपली सावली पडू नये याची दक्षता त्यांना बाळगावी लागे. त्यामुळे सकाळ-संध्याकाळ ज्या वेळी उन्हाच्या सावल्या लांब पडतात त्या वेळी अस्पृश्यांच्या व विशेषतः ब्राह्मणांच्या वस्तीतून जाण्यात फारच धोका असे. स्पृश्य व ब्राह्मण ज्या रस्त्यातून जात त्या रस्त्यात त्यांना गळ्यात मडकी बांधून जावे लागे. तसेच त्यांना कमरेला झाडाची फांदी लोंबती बांधली तरच रस्त्यातून फिरण्याची परवानगी असे. कारण त्यामुळे त्यांची पापी पावले उमटलेल्या मातीवरून ती फांदी फिरली म्हणजे पावलाच्या उमटलेल्या खुणा बुजून जात. अस्पृश्य जाती जनावरांपेक्षा नीच स्थितीला पोहोचली. ब्राह्मण जाती देवाच्या पदवीला पोहोचली व मध्ये इतर जाती सोपान परंपरेप्रमाणे राहिल्या. पेशवाई राज्यात सरकारी खजिन्यातून फार मोठा पैसा ब्राह्मणाच्या भोजनात व दक्षिणेत खर्च

होत असे. त्याबद्दल जोतिबांनी फार मोठी तक्रार केली आहे. ऐतखाऊ वशिलेबाज पुष्ट झालेला ब्राह्मणवर्ग आणि दारिद्र्याने धुळीस मिळालेला ब्राह्मणेतर बहुजनसमाज यांचे तुलनात्मक हृदयद्रावक वर्णन जोतिबांनी आपल्या निबंधातून केले आहे. देशी कायद्याच्या रानटी कठोरपणासंबंधी त्यांनी अनेक उदाहरणे दिली आहेत. फौजदारी गुन्हा करणाऱ्यांना अंगभंगाच्या शिक्षा दिल्या जात. हात तोडणे, पाय तोडणे अशा प्रकारच्या शिक्षा त्या वेळी कायद्याप्रमाणे दिल्या जात. अवयव तोडण्याची शिक्षा ब्राह्मणी राज्याचाच मात्र विशेष नव्हे. कारण हिंदुस्थानात सर्वत्र हजारो वर्षे या तऱ्हेची शिक्षा फौजदारी गुन्ह्यास सर्व प्रकारच्या राजवटीत दिल्या जात. हाल हाल करून देहान्त शिक्षा करण्याचा प्रकार व अंगभंगाचे शासन पेशवाईतही चालू राहिले. हा पेशवाईचा दोष नव्हता, तर तो हजारो वर्षांच्या परंपरेचा दोष होता. परंतु इंग्रजी राज्यात अशा प्रकारच्या क्रूर शिक्षा बंद झाल्या. जुन्या व नव्या राजवटींची तुलना निःपक्षपाती बुद्धी असलेला मनुष्य करू लागला तर त्याला इंग्रजी राज्याचा कायदा सुधारलेला व अधिक उन्नत अशा न्यायतत्त्वावर उभारलेला आहे असे दिसणे स्वाभाविक मानिले पाहिजे. सुळावर देणे, उलटे टांगून अंगातून रक्त गळेपर्यंत चाबकाने फोडून काढणे, राखेचा तोबरा देणे, हत्तीच्या पायाखाली तुडविणे, तोंडात तेल, शेंदूर किंवा धातूचा तप्त रस ओतणे, कडेलोट करणे या गोष्टी इंग्रजी राज्याच्या कायद्यांत गुन्हेगाराच्या शिक्षेच्या कलमातून गाळल्या गेल्या. त्याचप्रमाणे जातिभेदाप्रमाणे मानलेला उच्चनीच भाव व पक्षपात इंग्रजी कायद्यांतून नष्ट झाला आणि मनुष्य या नात्याने सगळे प्रजाजन समान होते हे तत्त्व इंग्रजी कायद्यांत दाखल झाले व त्याची अंमलबजावणी झाली. तशी गोष्ट पेशवाईत नव्हती. पेशवाईत जातिभेदांतील वैषम्य व पक्षपात हा कायदा समजून कडक रीतीने अंमलात आणणे हे राज्यकर्ते आपले कर्तव्य समजत. रहाणी, पोशाख, चालीरीती याबाबतीत ब्राह्मणांचे अनुकरण करून त्यांची बरोबरी करणे हा कायदेशीर गुन्हा समजला जात असे. त्याची अंमलबजावणी पेशवाईच्या उत्तरार्धात अधिक करडेपणाने होऊ लागली. मुसलमानी अमदानीत या बाबतीत पुष्कळ शैथिल्य आले होते. परंतु पेशवाईत ब्राह्मणमहात्म्य शिखरास पोहोचल्यामुळे जातिभेदाच्या मर्यादा व निर्बंध अधिक कठोर बनले. ते निर्बंध कडक रीतीने पाळणारा ब्राह्मण जादा दक्षिणा व मानमान्यता यांस पात्र होऊ लागला या गोष्टीची आठवण जोतिबांच्या काळी अगदी ताजी होती आणि जातिभेदाची तीव्रता ब्रिटिशांचे राज्याच्या कायद्यात जरी कायदेशीर नव्हती तरी परंपरेच्या दृष्टीने ती पेशवाईइतकीच अमलात होती. त्यामुळे जातिभेदाच्या अवजड यंत्राखाली जे दडपले गेले, त्यांच्या हीन स्थितीचा व दुर्दैवाचा अर्थ जोतिबा फुले यांस चांगला उमैजला, कारण ते त्यांच्यातच जन्मास आले होते.

पूर्वीच्या राज्यांत एक प्रकारची बेबंदशाही वाढीस लागलेली होती व तिचा अतिरेक होऊ लागला होता. त्याचे ताजे स्मरण जोतिबांना होते. पेंढारी, लुटारू लोक व गावगुंड



यांचे प्रस्थ वाढल्यामुळे प्रजेतील उमेद नाहीशी झाली होती. सरकारी अधिकारीवर्ग लुटारू व पेंढारी यांचेप्रमाणे हम करे सो कायदा अशा रीतीने वागत असल्यामुळे प्रजेत कष्ट करून धनार्जन करण्याचा उत्साह राहिला नव्हता. मालमत्ता असुरक्षित होती, म्हणून मेहनत करून मिळविलेले फळ जर भोगण्याची शाश्वती नाही तर मेहनतच का करावी अशी वृत्ती उत्पन्न झाली होती. म्हणून नवीन इंग्रजी राजवटीचे स्वागत नकळतपणे प्रजा करू लागली. त्यात जोतिबा फुल्यांसारखे सुधारक विचारपूर्वक भूतकाळातील इतिहासाचा अर्थ करू लागले आणि इंग्रजी राज्यातही भूतकाळातील समाजरचना टिकून राहात आहे हे पाहिल्यामुळे ते मूलगामी पद्धतीचा विचार करू लागले. सुधारलेल्या इंग्रजी राज्याच्या आगमनाने त्यांना भारतीय इतिहासाचा आणि जीवनाचा नवा अर्थ कळला आणि त्या राज्याचा परकीय म्हणून विरोध करण्याऐवजी सुस्वागतम् म्हणून त्यांनी स्वागत केले. त्यांना इंग्रजी राज्याने आपल्याबरोबर आणलेल्या पाश्चिमात्य संस्कृतीतून जीवनाचा नवीन संदेश मिळाला. तो म्हणजे मानवी स्वातंत्र्याचा. आजपर्यंत हिंदुस्थानातील जनता सामाजिक गुलामगिरीत बद्ध असल्यामुळे तिचा भौतिक व आध्यात्मिक अधःपात हजारो वर्षे होत आला असून ती जनता त्या गुलामगिरीची जाणीव होऊन तिचा नाश करण्यास उद्युक्त व्हावी अशी उत्कट इच्छा जोतिबा फुले यांचे ठिकाणी उत्पन्न झाली.

सुधारलेले इंग्रजी राज्य स्थापन झाले, परंतु हिंदी समाजात शतकानुशतके दृढमूल झालेले जातिभेद, अज्ञान, दारिद्र्य आणि अंधश्रद्धा हे दोष पूर्ण नाहीसे होतील अशी लक्षणे दिसेनात. सुधारलेल्या इंग्रजी राज्याच्या अनुषंगाने या भूमीत पाऊल ठेविलेल्या उदारमतवादी विचारसरणीने आणि पाश्चात्य संस्कृतीने या देशातील जनतेचा आत्मोद्धार होईल अशी मोहक आशा हृदयात सकृतदर्शनी निर्माण केली; परंतु समाजसुधारणेला जितका जोम यावयास पाहिजे होता तितका जोम येईनासा दिसेना. या परिस्थितीची जाणीव जोतिबा फुले यांचे ठिकाणी उत्पन्न झाली. इंग्रजी राज्याने आपल्या राज्याबरोबर आणलेल्या पाश्चात्य संस्कृतीतील उदार मूल्यांचाच खोल परिणाम होऊन जोतिबा फुले व तत्कालीन इतर सुधारक अंतर्मुख बनून हिंदी समाजाच्या सामाजिक दुर्गतीचे मनन करू लागले. जोतिबा फुले यांनी पहिल्यांदा जो आढावा घेतला त्यात त्यांना हिंदू समाजाच्या अधोगतीचे मूळ हिंदू समाजात हजारो वर्षे खोल रुजलेल्या सामाजिक गुलामगिरीत दिसले आणि ही गुलामगिरी सुधारलेल्या इंग्रजी राज्यातही तशीच कायम आहे, असे त्यांनी पाहिले. ह्या गुलामगिरीच्या मूळ कारणाचा शोध त्यांनी केला. त्यात त्यांना असे आढळले की, ब्राह्मणांनी आपल्या नेतृत्वाखाली निर्माण केलेला धर्मच यास जबाबदार आहे. म्हणून त्यांनी पहिले जे पुस्तक लिहिले त्यास 'सुधारलेल्या इंग्रजी राज्यात ब्राह्मणी धर्माच्या आडपडद्यात गुलामगिरी' असे नामाभिधान केले. त्यांना विचारांची स्फूर्ती पाश्चात्य लोकसत्तावादी तत्त्वज्ञानाने दिली. म्हणून त्यांनी हे पुस्तक

